मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक ३४ वें..

# गौप्यगोपन.

[ पांच अंकी नाटक. ]



श्रीयुत विठ्ठल सीताराम गुर्जर,

यांनीं लिहिलें.

[ प्रथमावृत्ति. ]



मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

गिरगांव-मुंबई.

किंमत ०-८-०. ]  [ मार्च १९०८.

# प्रस्तावना.

प्रस्तुत नाटक लिहून चारपांच वर्षे झालीं. 'मूकनायक नाटक'कर्त्याचा प्रस्तुत लेखकाशीं चांगला स्नेह आहे. आह्मां दोघांच्या कृतींत गुणांसंबंधीं जसें जमीनअस्मानाचें अंतर आहे, तसेंच एका बाबतींत विलक्षण साम्यहि आहे. कोल्हटकरांचें '**मूकनायक**' जसें नांवाप्रमाणें चार वर्षें मूक राहिलें होतें, त्याप्रमाणेंच माझें हें '**गौप्यगोपन**' नाटकहि आपल्या नांवाप्रमाणें चारपांच वर्षें गुप्त राहिलें होतें. '**मासिक मनोरंजन**'चे उत्साही संपादक श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र यांच्या प्रोत्साहनानें प्रस्तुत नाटक सांप्रत उजेडांत आलें नसतें तर तें आणखी किती वर्षें अंधकारांत राहिलें असतें कोण जाणे!

हें नाटक एका इंग्रजी नाटकावरून लिहिलें आहे. हें रूपांतर तर खरेंच, परंतु रूपांतरकर्त्याच्या पदरचें यांत बरेंच आहे—जवळ जवळ निम्याच्यापेक्षां अधिक आहे, असें ह्मटलें असतां चालेल. तेव्हां, निवळ भाषांतरापेक्षां वाचक याच्याकडे निराळ्या दृष्टीनें पहातील, अशी उमेद आहे.

या नाटकाला जर कांहीं स्वरूप आलें असेल तर तें रा. सा. गोपाळ वामन बापट, बी. ए., एल्‌ एल्‌. बी. जज्ज स्मॉल कॉज कोर्ट, आकोला ( वऱ्हाड ) यांनीं केलेल्या सूचनांचें फळ आहे. त्यांच्या अमूल्य सूचनांनीं माझ्या रूपांतरास तर मदत झालीच, परंतु त्यांच्या योगानें मूळ नाटकांतील अनेक दोषस्थळेंहि मला टाळतां आलीं. रा. सा. बापट यांनीं आपला अमूल्य वेळ खर्चून, गाढ विद्वत्ता व विशाल बुद्धिमत्त्व दर्शविणाऱ्या विधायक सूचनांचा विस्तृत निबंध माझ्या नाटकावर लिहून पाठविला, याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. त्याप्रमाणेंच श्रीयुत मित्र यांनीं मला प्रोत्साहन देऊन व थोडीशी सक्ति करून ह्मटलें तरीहि चालेल, बरेच दिवस भिजत पडलेलें हें नाटक मजकडून पुनः लिहून घेऊन प्रकाशित केलें, हे मजवर त्यांचे अपरिमित उपकार झाले आहेत.

| कशेळी, रत्नागिरी,<br>ता. १ फेब्रुआरी, १९०८. | } | **विठ्ठल सीताराम गुर्जर.** |
|---|---|---|

## पात्रें.

| | | |
|---|---|---|
| हैबतराव | ... ... ... ... | एक सरदार. |
| झुंझारराव | ... ... ... ... | हैबतरावाचा मुलगा. |
| संभाजीराव | ... ... ... ... | एक सरदार. |
| दौलतराव | ... ... ... ... | एक सुखवस्तु गृहस्थ. |
| रंभाजीराव | ... ... ... ... | झुंझाररावाचा मित्र. |
| हिरोजी | ... ... ... ... | झुंझाररावाचा नोकर. |
| पिऱ्या | ... ... ... ... | दौलतरावाचा हुजऱ्या. |
| दगड्या | ... ... ... ... | रंभाजीरावाचा हुजऱ्या. |
| तुळाजी | ... ... ... ... | संभाजीरावाचा हुजऱ्या. |
| तारा | ... ... ... ... | संभाजीरावाची मुलगी. |
| चंपा | ... ... ... ... | हैबतरावाची मुलगी. |
| गुलाब | ... ... ... ... | तारेची दासी. |
| मंजुळा | ... ... ... ... | चंपेची दासी. |

फौजदार, शिपाई, वगैरे.

# गौप्यगोपन.

## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

[ स्थल-कुंजपुरांतील एक रस्ता. हैबतराव व रंभाजीराव समोरून येतात, असा प्रवेश. ]

**रंभाजीराव**—कोण दादासाहेब? रामराम रामराम!

**हैबतराव**—कोण तो रंभाजीराव? बरेच दिवसांनीं आपली गांठ पडली ह्मणायची ही! कसें काय, ठीक चाललें आहे ना?

**रंभाजीराव**—ठीक चाललें आहे आपल्यासारख्या वडील मंडळीच्या कृपेनें! आपली प्रकृति मध्यें बरीच ढांसळली होती, ती नीट सुधारून आपण या स्थितीला आलां, हें पाहून मला फार आनंद झाला आहे. बरें पण मुरार-रावांची कशी काय तब्बेत आहे? ते कांहीं सुधारण्याच्या पंथांत आहेत का?

**हैबतराव**—छे रे! बिलकुल नाहीं! त्याच्या तापाचा जोर फार आहे ह्मणतात. या जखमेच्या दुखण्यांतून मुरारराव कांहीं बरा होत नाहीं, अशी लोकांत दाट बातमी आहे. त्याचें हें दुखणें ह्मणजे माझ्या झुंजाराच्या गळ्याला फांसच आहे! मुरारराव बरा होऊन झुंजारावरचें हें किटाळ दूर होवो, अशी परमेश्वराची मी रात्रंदिवस प्रार्थना करतों आहें.

**रंभाजीराव**—(इकडे तिकडे साशंक मुद्रेनें पाहून) पण झुंजारराव सुखरूप आहे ना?

**हैबतराव**—(स्वर खालावून) अझूनपर्यंत तरी आहे असें मला वाटतें. पण त्याला धरून देण्याबद्दल मोठें बक्षीस लावलें आहे, हें तुला माहीत असेलच.

**रंभाजीराव**—होय, तें मला आहे ठाऊक. त्याच्याकडून पत्रबित्र आलें होतें का कधीं?

**हैबतराव**—छे! तो इथून गेल्यापासून कांहीं आलें नाहीं. मुराररावाची प्रकृति सुधारल्याची बातमी कळेपर्यंत इकडे पत्रबित्र पाठवायच्या भानगडींत मुळींच पडूं नकोस, असें मींच त्याला इथून जातांना बजावलें होतें. असें पहा रंभाजीराव! एखादे वेळीं पत्र जर फुटलें, तर त्याचा पत्ता लागून त्याच्या जिवावरच बेतायचा प्रसंग यायचा कीं नाहीं?

**रंभाजीराव**—ही आपली सावधगिरी अगदीं योग्य आहे दादासाहेब! झुंजाररावाचा समाचार कळण्याविषयीं मी फार उत्सुक आहें खरा, परंतु तो कुठेंहि सुखरूप असावा हीच मुख्यत्वेंकरून माझी इच्छा आहे.

**हैबतराव**—दुर्दैवानें मुरारराव मेलाच, तर झुंजार इकडच्या प्रांताला कायमचाच अंतरला म्हणायचा! मग त्याला इकडे तोंड दाखवायची कांहीं सोय नाहीं! आपल्या जन्मभूमीला अंतरायचें अं? शिव शिव! असला प्रसंग शत्रू-वरहि येऊं नये! कायमची हद्दपारी! कायमची हद्दपारी!! (सुस्कारा टाकतो.)

**रंभाजीराव**—ईश्वर करो अन् मुरारराव बरा होवो! अविचाराच्या अन् तरुणपणच्या आवेशाच्या भरांत झुंजारराव आपलें स्वातंत्र्य मात्र गमावून बसला! बरें तर बरें—

**हैबतराव**—खरेंच रंभाजीराव, स्वतंत्रता म्हणजे एक अजब चीज आहे! प्रत्येक गोष्टींत आपण पूर्ण स्वतंत्र असावें असें जगांत कुणाला नाहीं वाटत? जगांतील प्रत्येक प्राण्याला परतंत्रतेचा तिटकारा असतो. तरी—तरी पण, व्यवहारांत कधीं कधीं असे कांहीं प्रसंग येतात कीं, त्या वेळीं दुसऱ्याचें स्वातंत्र्य हिरावून घेणेंच इष्ट आणि योग्य असतें. आतां ओघाला आलें म्हणून सांगतों. माझेंच उदाहरण पहाना—मी स्वातंत्र्याचा कट्टा भक्त असतां सध्या माझेवर असाच चमत्कारिक प्रसंग आला आहे! आनंदराव मोहिल्यांशीं माझ्या चंपेचें लग्न लावून टाकण्याचा मीं विचार केला आहे, पण हा माझा बेत त्या हट्टी पोरीच्या मुळींच मनास येत नाहीं. पण मी ऐकतों आहें थोडाच! कसेंहि करून मी आनंदरावांला चंपा देणारच! हल्लीं आनंदराव गेले आहेत सारंगपुरास. तेथें त्यांचा मेहुणा होता तो नुकताच वारला. त्याची मोठी थोरली मालदौलत आतां आनंदरावांनाच मिळायची आहे! सारंगपुरच्या त्यांच्या वाटेकडे माझे डोळे सारखे लागून राहिले आहेत. एकदा आनंदराव येतात कधीं

अन् चंपा त्यांच्या गळ्यांत माळ घालते कधीं, असें मला झालें आहे! हो, या अलीकडच्या पोरी काय करतील अन् काय नाहीं, याचा नेम नाहीं!

**रंभाजीराव**—काय? दादासाहेब! आपण ह्मणतां तरी काय? मी हें काय ऐकतों आहें? मी स्वप्नांत तर नाहीं ना? दादासाहेब! त्या थेरड्या, लोभी, मूर्ख आनंदरावाला तुह्मी आपली सुंदर, सुकुमार चंपा देणार? नयनमनोहर चंद्रकलेला राक्षसकेतूच्या जबड्यांत ढकलायला आपले हात वाहतील काय? त्या टोणप्या-वृद्ध-जांबुवंताला चंपा देण्यापेक्षां आपण आपल्या हातांनीं तिला विहिरींत कां लोटून देत नाहीं? दादासाहेब, या बोलण्याबद्दल आपण मला क्षमा करा. आपल्यासमक्ष माझ्या तोंडांतून जर कांहीं कमीजास्त शब्द आले असतील, तर ते आपल्या चंपेबद्दल मला वाटत असलेल्या प्रेमामुळें आणि काळजीमुळेंच, असें आपण समजा. आपण वडिल आहांत, मी लेंकरूं आहें, मी आपल्याला अधिक काय सांगणार?

**हैबतराव**—रंभाजीराव! तूं ह्मणतोस तें कांहीं केवळ खोटें नाहीं. पण अलीकडे अलीकडे माझी स्थिति काय झाली आहे, हें तुला माहीत नाहीं असें नाहीं. आनंदरावांपाशीं संपत्ति विपुल आहे आणि त्यांचें कुलहि चांगलें खानदानीचें आहे. हे दोन मोठे गुण त्यांच्या अंगीं आहेत, ह्मणून तर मी त्याला माझा जांवई करणार! तो मूर्ख, टोणपा आहे असें तूं ह्मणतोस. असेल कदाचित्, मी नाहीं ह्मणत नाहीं! परंतु ज्या मनुष्यापाशीं अपार धनसंपत्ति आहे तो मूर्ख—खुळा—वेडा—मतिमंद कसाहि असला तरी त्यांत मोठेंसें काय बिघडलें, हें मला कांहीं बुवा कळत नाहीं! बाकी, एखादा मूर्ख मनुष्य जर गरीब असेल, तर मात्र तो खरोखर कुचकामाचा, असें मी साफ ह्मणेन! आनंदरावांशीं संबंध जोडण्यांत मुख्य फायदा काय आहे, हें नाहीं आलें तुझ्या लक्ष्यांत रंभाजीराव! अरे, त्याचा वृद्धपणा आणि मूर्खपणा माझ्या पथ्यावर पडणार आहे, समजलास? एकदा तो माझा जांवई झाला कीं, त्या बैलोबाला मला वाटेल तसा नाचवतां येईल. मग तो अन् त्याची ती सारी धनदौलत हीं माझींच आहेत असें समज. अरे वेड्या! आयुष्याचें साफल्य करण्यासाठीं जगांत हीं अशींच धोरणें बांधावीं लागतात, समजलास?

**रंभाजीराव**—पण आपल्या मुलीचें कल्याण व्हावें, तिचा जन्म सुखांत जावा अशी आपली इच्छा नाहीं का दादासाहेब?

**हैबतराव**—वः ! मोठा शहाणाच तूं ! अरे, ज्याची एवढी राजासारखी संपत्ति, तो मुलीला नवरा करून देणें ही काय तिच्या कल्याणाची इच्छा नव्हे ? यापेक्षां बापानें मुलीचें कल्याण किंवा सुख काय पहायचें, हें मला नाहीं बुवा समजत !

**रंभाजीराव**—हें एका दृष्टीनें झालें. पण दुसऱ्या अनेक दृष्टींनीं या विषम विवाहाचा नको का विचार करायला ? सारें जग या लग्नाबद्दल काय ह्मणेल ?

**हैबतराव**—अरे जन तर बोलूनचालून दुतोंडें आहे ! आजपर्यंत कोणाच्या कोणत्या कृत्याला लोकांनीं नांवें ठेविलीं नाहींत ? रंभाजीराव ! तुला एक मी गुरुमंत्र सांगून ठेवितों. शहाण्या मनुष्यानें आपलें काम साधावयाला जगाची तिळमात्र पर्वा करूं नये !

**रंभाजीराव**—पण चंपाताईला हे असले बुड्ढे, मूर्ख नवरदेव कधींहि आवडायचे नाहींत—अन् आवडतहि नाहींत असें आपण मघांशीं ह्मणालांत ! जिचें लग्न करायचें, तिचा निदान या बाबतींत कांहींच का नको विचार घ्यायला ?

**हैबतराव**—हः हः ! वहावा ! खाशी रंभाजीराव ! हें मात्र तुझें ह्मणणें अगदीं बरोबर आहे ! पोरीची आवडनावड काय आहे हें समजून घेण्याचा मीं आजपर्यंत कधीं प्रयत्न केला नाहीं, आणि यापुढें कधीं करणारहि नाहीं ! पोरांची आवड अन् नावड ! विचारित बसला आहे कोण ? पोरांच्या मर्जीवर अन् आवडीवर आईबापांनीं सोंपविलें, तर मग खाशी तोड ! अगदीं अज्ञान-दशा होईपर्यंत तरी आईबापांनीं मुलांच्या इच्छेप्रमाणें चालूं नये, असें माझें ठाम मत आहे !

**रंभाजीराव**—पण ही गोष्ट अगदीं निराळी आहे दादासाहेब !

**हैबतराव**—पण हा रिकामा वाद हवा कशाला ? मी तुला आतां अगदीं स्पष्टच सांगतों. सारंगपुराहून आनंदराव येथें येतांक्षणींच त्यांच्याशीं चंपेचें लग्न लावून द्यायचा माझा पक्का निश्चय झाला आहे. प्रत्यक्ष ब्रह्मदेव जरी खालीं उतरला, तरी तो आतां ढळायचा नाहीं. माझ्या पोरावर जरी माझा अंमल चालला नाहीं तरी माझ्या पोरीवर मी तो पूर्णपणें चालवीन !

**रंभाजीराव**—दादासाहेब ! झुंजाररावाच्या संबंधाची गोष्ट यापेक्षां अगदींच निराळी होती. मुराररावाची बहीण कमळा, आपण झुंजाररावाकरितां वधू योजली होती, ती त्याला बिलकुल पसंत नव्हती. या लग्नाच्या पेंचांतून

करें तरी सुटावें ह्मणून मुराररावाशीं मारामारी करून तो इथून निघून गेला. झुंजाररावाचें हें करणें अविचाराचें खरें, पण यांत तो सर्वस्वी दोषी होता, असें निदान मी तरी ह्मणणार नाहीं. कमळेंत रूपच काय तें कमी होतें, पण या थेरड्या आनंदरावांत तर—

**हैबतराव**—पैशाशिवाय सर्वच न्यून, असेंच कीं नाहीं? अरे बाबा, या जगांत पैसा आहे तर सर्व कांहीं आहे! पैशाशिवाय रूप अन् गुण काय जाळायचे आहेत? तुह्मां अनुभवशून्य तरुण बांडांनां पैशाची किंमत कळते आहे कुठें? असो. बराच वेळ झाला इथेंच उभा राहून. मला त्या तिकडे गोपाळपुऱ्यांत काम आहे.

[ जातो.

**रंभाजीराव**—शिवशिव! काय भयंकर-राक्षसी विचार हे! कानांनीं ऐकवतसुद्धां नाहींत! जगांत विवाहसोहळ्याची धूळधाण होते ती अशाच विचारांनीं! तो निरक्षर, मूर्ख, थेरडा आनंदराव! त्याच्या अर्ध्यामुर्ध्या गोंवऱ्या देखील स्मशानांत गेल्या असतील, अन् या वयांत उल्लू बनून तो एका सुकुमार तरुण पोरीच्या जन्माचें मातेरें करण्याची इच्छा करतो आहे! अन् पैशाच्या लोभानें हा थेरडा प्रत्यक्ष पोटच्या गोळ्याची मान कापायला तयार झाला आहे! सुवर्णाचा काय विलक्षण प्रभाव हा! तें मनोहर, कोमल, चंपाकुसुम तो थेरडा पायाखालीं चुरडून टाकणार अं? चंपा ही माझ्या प्रिय मित्राची बहीण, एवढेंच काय तें माझें तिच्याशीं नातें! असें असून तिच्यासाठीं माझें अंतःकरण तिळतिळ तुटतें; अन् हा हैबतराव प्रत्यक्ष तिचा बाप—यानें तिला जन्म दिला—हा आपल्या स्वार्थाकरितां तिची मान मुरगळण्यास तयार झाला आहे! शिव शिव! मनुष्य एकदा आत्मपरायण झाला, कीं, तो काय करील अन् काय नाहीं याचा नेम नाहीं! आत्महितापुढें त्याला आईबाप, भाऊबहीण, अपत्य, सगासोयरा कांहीं—कांहींहि दिसेनासें होतें! या ह्मातान्याच्या मनांत असले भयंकर विचार खेळत असतील अशी या घटकेपर्यंत मला कल्पनाहि नव्हती! या संकटांतून चंपेची सुटका कशी करावी? या प्रसंगीं झुंजारराव येथें अवश्य पाहिजे होता, ह्मणजे या संकटाला कांहीं तरी उपाय खास निघाला असता! ( समोर पाहून ) कोण? हिरोजी! अरे, या वेळीं तूं इथें कसा आलास?

**हिरोजी**—( प्रवेश करून ) या पत्रावरून आपणाला सर्व समजेल !

**रंभाजीराव**—पण अगोदर मला सांग, तुझा धनी सुखरूप आहेना ?

**हिरोजी**—होय सरकार, सुखरूप आहेत. धनीसाहेबांचें हें दुसरें एक निकडीचें पत्र द्यायचें आहे, म्हणून घेतों आतां आपला हुकूम! रामराम!

**रंभाजीराव**—तें पत्र ताराबाईनांच असेल ?

**हिरोजी**—( हंसून ) होय सरकार, त्यांनांच !

[ जातो.

**रंभाजीराव**— चंपाताईची या संकटांतून सुटका करायला इथें झुंजारराव असता तर बरें झालें असतें असें मीं म्हणायला अन् त्याचें पत्र यायला एकच गांठ पडली, तेव्हां हा शुभ शकुनच म्हणायचा! बरें, पण आमचे हे राजश्री पत्रांत काय म्हणतात पाहू या—( वाचतो. )

''रंभाजीराव ! या मानवजीवितांत अत्यंत सुखद वस्तु दोन आहेत! एक सन्मित्र आणि दुसरी सच्छील रमणी ! या दोघांच्या दर्शनसौख्याला अंतरणें म्हणजे जीवंत असतां मृत्यु येणेंच आहे, असें मी समजतों. मुराररावाच्या संबंधानें चांगली किंवा वाईट बातमी मला कांहींच कळत नाहीं. या संशयित स्थितीच्या यातना आतां मला सहन होत नाहींत ! म्हणून आज सायंकाळीं तुझ्या घरीं येण्याचें धाडस करण्याचा मीं निश्चय केला आहे. रंभाजीराव ! तू भिऊं नकोस! मी धाडशी असलों, तरी तितका अविचारी नाहीं! मी तिकडे वेष पालटून येईन. प्रिय तारेचें दर्शन घेण्यासाठीं आणि मित्रा! तुला कडकडून भेटण्यासाठीं मी फार उत्सुक झालों आहें. सर्व हकीगत भेट झाल्यावर कळेलच.

झुंजारराव.''

काय म्हणावें आतां याच्या या धाडसाला ? सांपडला तर प्राणाशींच बेतेल, याचा या स्वारीला तिळमात्र तरी विचार आहे? माझें हृदयहि त्याला भेटण्याकरितां किती तरी उत्कंठित झालें आहे! झुंजारराव एकदाचा सुखरूपपणें येवो म्हणजे झालें ! असो. चला ( चालूं लागतो. ) कोण–कोण तो! दौलतराव तर नव्हे ?

[ दौलतराव प्रवेश करितो. ]

**दौलतराव**—होय मीच तो, रंभाजीराव ! तुझ्या अकल्पित भेटीनें मला किती आनंद झाला आहे म्हणून सांगूं !

**रंभाजीराव**—दौलतराव ! अरे, तूं कुठें इकडे ?

**दौलतराव**—गेलीं तीन वर्षे मी रामनगरच्या महाराजांच्या सैन्यांत अधिकारी आहें. बऱ्याच दिवसांत आप्तमित्रांची भेट आणि जन्मभूमीचें दर्शन न झाल्यामुळें मी आपल्या गांवीं जातों आहें. तिकडे जायला जवळचा रस्ता कुंजपुरांतूनच, म्हणून मी येथें आलों. कुंजपुरांत एकदोन दिवस राहून पुढें कूच करावें, असा माझा विचार आहे. पण कुंजपुरांत तूं असतोस हें मला मुळींच ठाऊक नव्हतें !

**रंभाजीराव**—किती तरी वर्षांनीं आपली ही भेट झाली दौलतराव ! मी तुला आतां दुसरीकडे कुठें नाहीं जाऊं देणार ! माझ्याकडेच तुला उतरलें पाहिजे.

**दौलतराव**—आतां तूं इथें भेटल्यावर मी दुसरीकडे जातों कशाला ? पण रंभाजीराव, माझ्यापासून तुला त्रासबीस तर नाहीं ना व्हायचा ?

**रंभाजीराव**—त्रास! तुझ्यासारख्या मित्राच्या संगतीनें त्रास ? छे छे ! मुळींच नाहीं. तुझ्या संगतीचा लाभ मला एकदीन दिवस मिळाल्याबद्दल उलट तुझे मजवर उपकारच होणार आहेत. (समोर पाहून) हा कोण ?

[ पिऱ्या येतो. ]

**दौलतराव**— हा माझा नोकर पिऱ्या.

**पिऱ्या**— धनीसाब! ह्योच मुजरा आपल्याला आन् आपल्या नोकरीला! आपल्या बाच्यानूबी असली नोकरी होईना पघा ! आज तीन दिस कुऱ्यावानी सारखा धावतो हाये-एक खिनाचीबी फुरसत मिळेना गुडगुडी ओढाया !

**दौलतराव**—पिऱ्या! सुटलें का तुझें तें आडदांड तोंड? लागली वाटतें पुनः तुझी पाठ वळवळायला ? बेवकूफ! गद्धा !!

**पिऱ्या**— ऱ्हायल सरकार ! पन् त्या घोड्यांची विवस्था काय करायची ? ह्ये तरी आपनासनी इचारूं का नग ? ते यत तसच ऱ्हायल, तर ह्न्हानं तडफडूनशान परान सोडतील की ! आन् मग तंगड्या तोंडीत जाव लागल, तवां कळल सुक !

**रंभाजीराव**—त्यांची सर्व व्यवस्था मी करवितों. (मोठ्यानें) ए-ए दगड्या ! दगड्या ! इकडे ये. (दगड्या येतो.) दगड्या ! हा पिऱ्या दाखवील ते घोडे नेऊन

आपल्या तबेल्यांत नीट बांध अन् त्यांच्या दाण्यावैरणीची नीट व्यवस्था कर, समजलास ना ?

**दगड्या**—जी सरकार–कुठ हायती ते घोड ? चला की राव, दावाया !

**पिन्या**—व्हो असा ह्योर–मोटेच्या बैलावानी मी असा का दमुनशान गेलो हाय–का काय सांगूं ! पोटामंदीं कावळ वराड वराड वराडल्यात आन् तुमच्या तुझ्या तोंडच्या गप्पांनीं भूक निवतीया थोडीच ! चल, व्हो असा ह्योर !

[ पिन्या व दगड्या जातात.

**रंभाजीराव**—हः हः ! तुझा हा गडी मोठा गमत्या दिसतो. हो, तूं तरी काय कमी आहेस म्हणा ! धनी तसा नोकर ! पूर्वी कारंजपुरांत आपण किती मौजेनें दिवस घालविले, त्याची आठवण आहे का तुला दौलतराव ? तुझ्या त्या वेळच्या कधींहि लग्न न करायच्या वल्गना अझून तशाच चालू आहेत का ?

**दौलतराव**—काय सांगूं तुला रंभाजीराव ? अझून जरी मी विवाहाच्या सुवर्णशृंखलेनें—

**रंभाजीराव**—काय म्हणतोस ? विवाहाची ' सुवर्ण ' शृंखला ! हे शब्द अन् दौलतराव, तुझ्या तोंडांत !

**दौलतराव**—रंभाजीराव ! मध्येंच माझा असा हिरमोड करूं नकोस ! अझून जरी मी विवाहाच्या सुवर्णशृंखलेनें बद्ध झालों नाहीं, तरी त्या वेळच्या माझ्या वल्गना, तूं सांगत होतास त्याप्रमाणें आतां खरोखरच फोल ठरूं पहाताहेत ! रंभाजीराव ! पोरपणाच्या आवेशाच्या भरांत मागेंपुढें कांहीं न पहातां आपण वाटेल तें बहकतों व भलभलत्या प्रतिज्ञा आणि निश्चय करतों, असें आतां माझ्या पूर्णपणें अनुभवास आलें आहे. तूं माझा जिवलग दोस्त, तुझ्यापाशीं माझें हृद्गत सांगायला मला कांहीं शंका वाटत नाहीं; पण—

**रंभाजीराव**—दौलतराव, माझ्यापाशीं कोणतीहि गोष्ट बोलायला तूं इतकी प्रस्तावना करशील, असें मला वाटलें नव्हतें !

**दौलतराव**—छे छे ! तसें मुळींच नाहीं. अशी भलतीच शंका घेऊं नकोस ! माझ्या पूर्वीच्या विचारांत हल्लीं इतकी क्रांति झाली आहे कीं, तुझ्या-सारख्या जिवलग मित्राशींहि बोलून दाखवायला मला फार लाज वाटते ! माझे पूर्वीचे ते विचार आतां पार बदलले ! इतकेंच नव्हे, तर स्त्रीजातीचा द्वेष करणारा मी हल्लीं अगदीं अंतर्बाह्य स्त्रीमय बनून गेलों आहें ! जगांत मला

आतां रमणीप्रेमाशिवाय कांहीं दिसतहि नाहीं आणि भासतहि नाहीं! तूं हंसतो आहेस रंभाजीराव! हंसण्यासारखीच ही गोष्ट आहे! माझ्यांत हल्लीं हा विलक्षण फरक झाला आहे खरा! ही गोष्ट नाकबूल करणें म्हणजे शुद्ध दांभिकपणा आहे. आणि दांभिकपणा अगर खोटा डौल माझ्यासारख्या सरळ शिपाईगड्याला बिलकुल रुचत नाहीं. एक घाव अन् दोन तुकडे!

**रंभाजीराव**—पण असा फरक व्हायला कारण तरी काय झालें?

**दौलतराव**—कारण? कारण आपणच महाराज!

**रंभाजीराव**—कोण! मी का? ठीक ठीक! तूं अंतर्बाह्य स्त्रीमय बनायला मी कसा काय कारण झालों बुवा? मी काय एखादी सुंदर परी आहें, तो तूं माझ्यावर आषक्त होऊन इतका वेडा होशील?

**दौलतराव**—सांगतों कसें तें! आपल्या मैत्रीचें दृढ बंधन तोडून माझ्या आग्रहाविरुद्ध जेव्हां तूं कारंजपुरांत मला एकटाच सोडून निघून गेलास, तेव्हां मला फार दुःख झालें. मी स्नेहाचा फार भुकेला आहें. त्या प्रसंगीं माझ्या एकटेपणाबद्दल मला पुष्कळ वाईट वाटलें. एखाद्या कवीप्रमाणें माझे विचार भरकटूं लागले. सर्व विश्वांत मला एकटी अशी एकहि वस्तु दिसेना! जिकडे पहावें तिकडे प्रेमानें बद्ध झालेलीं द्वंद्वेंच मला दिसूं लागलीं! रात्रंदिवस असले हे विचार मला सोडीनात. या अवाढव्य जगांत मीच काय तो एकटा, हा विचार मला असह्य होऊं लागला. झालें! माझे पूर्वीचे विचार याप्रमाणें मला नकळत पार बदलले आणि मी पूर्ण स्नेहमय-स्त्रीप्रेममय म्हण पाहिजे तर-बनलों, आणि सर्वांत मौज ही कीं, माझ्या प्रणयास विषयीभूत अशी रमणी मात्र मुळींच नाहीं! आणि या सर्वाला कारण कोण म्हणशील तर, रंभाजीराव, तूं!

**रंभाजीराव**—वहावा! ठीक ठीक!! आपण महाकवीची दीक्षा अगोदर घेतलीत, कीं, शिपाईपेशाचा अगोदर अंगिकार केलात?

**दौलतराव**—या रात्रंदिवस जाच करणाऱ्या विचारापासून मन थोडें तरी परावृत्त करावें या हेतूनें त्याला दुसरीकडे गुंतविण्याचे हेतूनें मी रामनगरास सैन्यांत नोकरी धरली. पण छे, माझे सर्व प्रयत्न व्यर्थ गेले! जसजसा काळ लोटूं लागला, तसतसा मी प्रेमाच्या दृढ पाशांत अधिकाधिकच गुंतूं लागलों. शेवटीं, कंटाळून रामनगराहून स्वदेशाला जायला निघालों, तों इथें तुमची ही अवचित गांठ पडली.

**रंभाजीराव**—असो. एकून माझें म्हणणें तुला पटलें तर ?

**दौलतराव**—अगदीं पूर्णपणें ! रंभाजीराव ! त्यावेळीं मी तुझी टर उडवित असें, त्याबद्दल मी आतां तुझी क्षमा मागतों !

**रंभाजीराव**—अरे, क्षमा कसली मागतोस त्यांत ? बरें, तो विषयच आपण आतां सोडून देऊं. दौलतराव, आमचा हा प्रांत कसा काय वाटतो तुला ?

**दौलतराव**—इतर सर्व गोष्टींत ठीक आहे. पण इथें आल्यापासून माझ्या स्वभावानुरूप एका विशेष गोष्टीकडे माझें लक्ष्य लागून राहिलें आहे; ती गोष्ट म्हटली म्हणजे तुमच्या या प्रांतांतील स्त्रियांची–त्यांतून विशेषत: तरुण स्त्रियांची स्थिति ! आमच्या तिकडील स्त्रियांप्रमाणें यांनां स्वतंत्रता दिसत नाहीं !

**रंभाजीराव**—म्हणजे ? अलीकडे बायकांनीं बंड करून तुमच्या देशांत प्रमिलेप्रमाणें स्त्रीराज्याची तर स्थापना केली नाहीं ना ? हो, नाहीं तर, तुमच्या प्रांताकडील आणि इथल्या बायकांच्या स्थितींत स्वतंत्रतेसंबंधीं विशेष कांहीं फरक असूं नये ! मग तुला तसें कां वाटावें कोण जाणे !

**दौलतराव**—तूं काय वाटेल तें म्हण, माझें म्हणणें जर खोटें असतें, तर माझ्या या भुकेलेल्या डोळयांनां अझूनपर्यंत एकहि उच्च दर्जाची रूपवती मनोहर तरुण सुंदरी कां दिसूं नये ? मी तर जिकडे तिकडे अगदीं बारकाईनें निरीक्षण चालविलें होतें !

**रंभाजीराव**—वहावा ! दौलतराव ! तर मग तुझ्या स्त्रीस्वातंत्र्याच्या कल्पना कांहीं विलक्षणच दिसतात ! एवढ्याशा अल्प कालांत तुझ्या दृष्टीला कोणी सुंदर स्त्री पडली नाहीं म्हणून इथल्या स्त्रियांनां स्वतंत्रता नाहीं असा तूं सिद्धांत ठोकून दिलास ? छान !

**दौलतराव**—स्त्रियांच्या स्वतंत्रतेचा हा रिकामा वाद पाहिजे कशाला उगीच ? पण गड्या, माझें संधान जमण्यासारखें नाहीं कारे कुठें तुझें बस्तान इथें ?

**रंभाजीराव**—छे ! आपलें तर नाहीं बुवा कुठें ! मी आपला साधा भोळा सरळ मनुष्य ! आपल्याच नशीबावर हवाला ठेवून तूं इथें कांहीं दिवस रहा मात्र ! अरे, तुझ्यासारख्या राजबिंड्या तरुणाकडे बायको आपोआप चालून येईल !

**दौलतराव**—असे हातपाय गाळूं नकोस ! नशीबावर हवाला ठेवून स्वस्थ रहाणें हें तुझ्यामाझ्यासारख्या खऱ्या मर्दांचें काम नव्हे ! मग रंभाजीराव ! माझ्यासाठीं बायको शोधून काढायला बांधतोस ना कमर ?

**रंभाजीराव**—पण ती कशी असली पाहिजे? हा प्रश्न मी उगीच विचारतों आहें ह्मणा! कारण, तुझ्यासारख्या प्रेमाचें वेड लागलेल्या मनुष्याची बायको ह्मणजे स्वरूपानें निदान इंद्राच्या रंभेसारखी तरी अवश्य पाहिजेच!

**दौलतराव**—अलबत्! हें काय वेड्यासारखें विचारतोस?

**रंभाजीराव**—शिवाय, तिनें तुझ्याकडे येतांना आपल्याबरोबर मोठें थोरलें डबोलेंहि घेऊन आलें पाहिजे, होय ना?

**दौलतराव**—तर! त्याशिवाय बुवा कसें चालणार? मघांच्या माझ्या प्रेमाच्या बरळण्यावरून मला एखादी कफल्लक बायको चालेल, अशी भलती-सलती वेडगळ कल्पना करून घेऊं नकोस हो! ही विवाहाची गोळी जर चांगली सुवर्णाच्छादित नसेल, तर ती आपल्या घशाखालीं नाहीं उतरायची बुवा!

**रंभाजीराव**—अरे, उत्तम सौंदर्य असलें ह्मणजे ती गोळी चटकन् तुझ्या घशाखालीं उतरेल, अशी माझी खात्री आहे!

**दौलतराव**—उतरेल कदाचित् पहिल्यापहिल्यानें! पण पुढें ती माझ्या पोटांत टरेल, असें कांहीं वाटत नाहीं. रंभाजीराव! या सर्व सृष्टीमध्यें युवती या विलक्षण मोहक वस्तु आहेत, हें मी कबूल करतों. पण सुवर्णाची गोष्ट कांहीं निराळीच आहे! सोनें त्यांच्यापेक्षांहि अधिक मोहक आहे, यांत शंका नाहीं. स्त्रियांचें रूप, शरीर, बांधा, कांति, सु-वर्ण सर्व कांहीं चकचकणाऱ्या सुवर्णामुळेंच खुलतें! त्या स्वर्गांतल्या देवता वाटतात त्या सुवर्णामुळेंच!

**रंभाजीराव**—(स्वगत) काय विलक्षण मनुष्य आहे पहा! मघांशीं प्रेम-तरंगांत बेसुमार वहात होता, आतां धनाविषयींच्या कल्पनाप्रवाहांत तितकाच भडकला आहे! कशाला कांहीं पत्ताच नाहीं! (उघड) पण दौलतराव, मग स्त्रियांनांहि सुवर्णाविषयीं तुमच्याइतकीच महती कां वाटूं नये?

**दौलतराव**—नाहीं कोण ह्मणतो? त्यांनांहि तसेंच वाटतें—

**प्रेमशृंखला विवाहहेतु न कोणी मानी अतां।**
**प्रीति ही पावे तृणसमता।**
**भार्या घरची, पशु दारिंचा तुल्य गुणीं होतां॥**

**रंभाजीराव**—अरे वः! तुझ्या अंगीं कवित्वशक्तिहि चांगलीच आहे ह्मणायची! दौलतराव, मोठा रंगेल गडी आहेस बुवा तूं! बरें, चल जाऊं घरीं. वाटेच्या श्रमानें तूं फार थकलेला दिसतोस; तेव्हां घरीं जाऊन अगोदर कांहीं तरी पोटाची तजवीज बघूं, अन् मग काय तो पाहूं पुढला विचार!

**दौलतराव**—रामनगरच्या माझ्या एका मित्राचें इथें एक जरूरीचें काम करायचें आहे, तें अगोदर उरकून घेतों, अन् तसाच तुझ्याकडे येतों. मग काढूं मजेनें वेळ! बरें, पण तूं रहातोस कुठें?

**रंभाजीराव**—हा पलीकडे हिरव्या कठड्याचा बंगला दिसतो आहे हा-

**दौलतराव**—बरें तर, संध्याकाळचे सुमारास येतों मी तुझ्याकडे. रामराम!

**रंभाजीराव**—ठीक आहे! मी तुझी वाट पहात बसतों.

[ जातात.

---

## प्रवेश २ रा.

[ स्थल—दैवतरावाच्या वाड्यांतील एक खोली. चंपा झोंपाळ्यावर बसली आहे, मंजुळा जवळ उभी आहे, असा प्रवेश. ]

**चंपा**—नाहीं मंजुळे! तूं आग्रहानं मला या झोंपाळ्यावर आणून बसविलंस खरं, पण अशानं का माझी कांचणी नाहींशी होईल? हृदयांत चिंतेचा डोंब उठला आहे, मग तूंच सांग बरं, माझ्या तोंडांतून गाण्याचं अक्षर तरी कसं यावं? आतां ते हंसण्याचे, गाण्याचे दिवस मला विसरले पाहिजेत! यापुढं आतां चिंता, दुःख अन् शोक यांशिवाय या माझ्या फुटक्या नशिबांत कांहीं नाहीं!

**मंजुळा**—इडापिडा टळो अमंगळ पळो! असं काय बरं अभद्र बोलावं बाईसाहेब? तुम्ही कांहीं काळजी करूं नका. माझी मनपिंगळी लवते कीं तुमच्यावरचं हें संकट खास टळेल!

**चंपा**—हें आपलं तूं माझं समाधान व्हावं म्हणून कांहीं तरी बोलते आहेस झालं! मला पण तुझ्यासारखंच वाटत होतं; पण परवां बाबांनीं काय निक्षून सांगितलं तें तूं ऐकलंस ना? एक वेळ सूर्य पश्चिमेला उगवेल, पण बाबांनीं केलेला निश्चय कध्धीं कध्धीं फिरायचा नाहीं!

**मंजुळा**—असंच केवळ कांहीं नाहीं म्हणतां यायचं बाईसाहेब! तुमचं लग्न-

**चंपा**—नको मंजुळे! तो शब्दसुद्धां आतां उच्चारूं नकोस! 'लग्न' हा शब्द मी ऐकला, कीं, माझं हृदय कुणी तरी अगदीं पिळून टाकतं आहे असं वाटतं, अन् एकाएकीं भूत समोर उभं राहिलंसं वाटून मी अगदीं घाबरून जातें!

**मंजुळा**—पण बाईसाहेब ! त्या बिचाऱ्या 'लग्ना'वर तुमचा कां एवढा राग ? त्या थेरड्या आनंदरावाशीं तुमचं लग्न लागणार या विचारानं तुमची तशी स्थिति होणं अगदीं साहजिक आहे. पण त्या जांबुवंताऐवजीं तुमच्या अगदीं मनाप्रमाणं नवरा तुह्माला मिळाला, तर मग त्या शब्दानं राग येण्याबद्दल आनंदच वाटेल ! असंच ना बाईसाहेब ?

**चंपा**—तूं ह्मणतयेस तें खरं आहे. पण मंजुळे, त्या थेरड्या भुताबरोबर लग्न होऊन माझ्या सर्व जन्माचं मातेरं होणार ही कल्पना मनांत आली ह्मणजे माझ्या हृदयांत जी भयंकर कालवाकालव होत आहे, तिची कल्पना तुला कशी होणार ? माझेप्रमाणंच ज्या एखाद्या दुर्दैवी पोरीवर असा प्रसंग आला असेल, तिलाच खरोखर माझ्यावर आलेल्या प्रसंगाची खरीखरी कल्पना येईल. अहाहा ! काय त्या मेल्याचं ध्यान ! रूपाकडे बघून डोळे निववीन, तर तेंहि नाहीं. शरीरानं तर केवळ अष्टावक्र ! बरं, हीं व्यंगं झांकायला खारीला थोडा तरी शहाणपणा किंवा अंगांत कांहीं सद्गुण तरी असावे होते ! आणि या सर्वांच्या वर कडी ह्मटली ह्मणजे मेल्याच्या वृद्धपणाची ! असल्या महाशंख मंडळीला ऐश्वर्य देऊन ईश्वर आमच्यासारख्या गरीब गाईंचे गळे कापतो ह्मणायचं ! पण यांत देवाला तरी दोष कां लावावा ? मी ह्मणतें, मेले पुरुषच आमच्या या दुःखाला कारण होतात !

**मंजुळा**—होय बाईसाहेब ! तुह्मी ह्मणतां तें अगदीं खरं आहे.

**चंपा**—असला जुलुम पुरुषांवर व्हायला लागला, तर ते घेतात का तो सोसून ? आमच्या दादाचीच गोष्ट पहाना ! थेट माझ्याप्रमाणंच बाबांनीं त्याच्यावरहि प्रसंग आणला होता. पैशाच्या लोभानं, तो नको नको ह्मणत असतां बाबांनीं मुराररावाची बहीण कमळा हिच्याशीं त्याचं लग्न ठरविलं. तो ऐकत नाहींसं पाहून बाबांनीं त्याला नाहीं नाहीं त्या दहशती घातल्या. पण दादानं बाबांचा जुलुम मुळींसुद्धां चालूं दिला नाहीं ! शेवटीं, कांहीं तरी निमित्तानं मुराररावांशीं मारामारी करून तो इथून निघून गेला. पण माझी गोष्ट पहा ! मला कांहीं दादासारखं करतां येणार आहे का ? खरंच, आह्मां बायकांसारख्या दुर्दैवी आह्मीच !

**मंजुळा**—बाईसाहेब ! परतंत्रतेमुळं आपणाला हीं सारीं दुःखं भोगावीं लागतात.

**चंपा**—जन्मल्यापासून मरेपर्यंत, पाळण्यापासून चितेपर्यंत आम्हांला कधींहि लवमात्र स्वातंत्र्य म्हणून नाहीं! दास्य आणि परतंत्रता यांच्या घाणेरड्या दलदलींतच आम्हांला कुजून मरावं लागतं! जन्मल्यापासून लग्न होईपर्यंत बापाच्या, लग्नानंतर नवऱ्याच्या, अन् ईश्वराच्या मर्जीनं तेंहि बंधन तुटलं तर पुत्राच्या किंवा बंधूच्या पारतंत्र्यांत आम्हांला दिवस कंठावे लागतात! त्यांच्या बऱ्यावाईट आज्ञा आम्हांला अगदीं डोळे मिटून मान्य करणं भाग पडतं! सारांश, आम्ही बायका मुलींच्या, विवाहित स्त्रियांच्या किंवा विधवांच्या स्थितींत असलों तरी पुरुषांच्या दास्यांतच आम्हांला रहावं लागतं! सुदैवानं ही पुरुष मंडळी सुधी असली तर सारं ठीक निभतं; पण जर का यांपैकीं एखादा पुरुष जुलमी निघाला, तर आमच्या हालअपेष्टांस मग पारावर रहात नाहीं! असले विचार आम्ही कुलीन मुलींनीं मनांतसुद्धां आणूं नये हें खरं; परंतु अगदीं जिवावरच बेतलं म्हणजे हरीणसुद्धां पारध्यावर उलटतं! बाबांचा हा जुलूम टाळण्याकरतां बैरागीण बनून एकतारी वाजवित आयुष्य कंठणं कांहीं वाईट नाहीं, असंहि मला वारंवार वाटतं!

**मंजुळा**—हा नाहीं आपला विचार मला मुळींच पसंत! अशानं आपण आगींतून निघून फुफाट्यांत सांपडाल इतकच! संकटाला भिऊन पळण्यापेक्षां धीरानं अन् नेटान त्याला तोंड देऊन त्यांतूनच मार्ग काढणं मनुष्याला भूषण आहे! बाईसाहेब, बोलल्ये याची माफी असावी. आपल्यासारख्या श्रीमंत, कुलीन स्त्रियांनीं बैरागीण होऊन हिंडणं, म्हणजे आत्महत्या केल्याप्रमाणंच नाहीं का? मी आपल्या जागीं असल्यें, तर—

**चंपा**—काय केलं असतंस तूं?

**मंजुळा**—आपण रागावणार नाहीं तर सांगल्यें!

**चंपा**—सांग, नाहीं रागवत!

**मंजुळा**—धाडस तर खरंच! पण बाबासाहेबांची नजर चुकवून मीं कुठं तरी सूं केलं असतं पहिल्यानं! घर सोडून आपण कुठंहि जरी गेलांत, तरी इथल्यापेक्षां आपणाला तिथं अधिक दुःख व्हायचं नाहीं हें खास! माझ्या बापानं माझ्या मर्जीविरुद्ध जर कुणाशीं माझं लग्न लावण्याचा घाट घातला असता, तर मीं काय वाटेल तें केलं असतं, पण त्याचा बेत कधींहि सिद्धीस म्हणून जाऊं दिला नसता!

**चंपा**—मंजुळे ! काय सांगत्येस तूं हें मला ? एकदा बोललीस तें बोललीस, पण माझ्यासमोर पुन्हा असले शब्द उच्चारलेस तर खबरदार ! घरच्या घरींच राहून त्या मेल्या मांगापासून माझी सुटका करण्याचा मी हरप्रयत्न करीन अन् तें नाहींच साधलं, तर शेवटीं जीव देईन !

[ हैबतराव प्रवेश करितो. ]

**हैबतराव**—(स्वगत) असें काय ताईसाहेब ? 'तो मेला मांग' म्हणजे कोण ? मी कीं आनंदराव ? बहुधा आनंदरावच असेल ! कारण, मला उद्देशून ही असले शब्द उच्चारील असें नाहीं वाटत ! बरें झालें, मी आतां इथें आलों तो ! मला अगोदर संशय होताच म्हणा; आतां थोडाच अवकाश आहे तोंपर्यंत हिच्यावर नीट नजर ठेवली पाहिजे. ( उघड ) कसें काय चंपाताई ? काय करते आहेस ?

**चंपा**—काय करायचं आहे बाबा ? बसल्यें आहें आपल्या फुटक्या नशीबाला दोष देत !

**मंजुळा**—( स्वगत ) म्हाताऱ्यानं चोरून ऐकलंन् वाटतं सारं !

**हैबतराव**—वेडे पोरी ! तुझें नशीब जर फुटकें, तर धडकें तरी कुणाचें ? तुझ्यासारखी नशीबवान तूंच !

**चंपा**—खरंच बाबा ! माझ्यासारखं नशीब या सगळ्या जगांत कुणाचं दिखील नसेल !

**हैबतराव**—तुझ्या नशीबाचा सगळ्या बायकांना हेवा वाटत असेल ! चंपे ! मी तुला एक आनंदाची बातमी सांगायला आलों आहें. आनंदराव उद्यां सारंगपुराहून इथें येणार–असें तोंड फिरवूं नकोस लाजेनें !

**चंपा**—( स्वगत ) अगबाई ! उद्यांच माझं मरण आलं तर !

**हैबतराव**—( हातांतील पत्र दाखवून ) हा पाहिलास तुझ्या सवाई शिकंदर नशीबाचा प्रत्यक्ष पुरावा ! हें आनंदरावांचें पत्र आत्तां आलें. आनंदराव काय लिहितात यांत ऐकलेंस का चंपाताई ? ( वाचतो. )

" एकंदरींत, सारंगपुरास आल्याचें चांगलेंच सार्थक झालें. माझ्या मेहुण्याचें येथें सुमारें वीस हजारांचें वार्षिक उत्पन्न आहे. तें सारें आतां माझ्याच नांवानें झालें आहे. हें वर्तमान माझ्या भावी प्रियेस अवश्य तावडतोब कळवून, माझ्या आनंदाची तिला वांटेकरीण करावी. "

चंपे! पाहिलीस ना तुझ्या नवऱ्याला तुझ्या सुखाविषयीं एव्हांपासून किती काळजी आहे ती! आनंदराव अगोदरच पिढीजाद गर्भश्रीमंत. त्यांतून सारंगपुरचें हें आणखी उत्पन्न त्यांनां मिळालें. चंपाताई! आतां काय विचारतां तुमचें ऐश्वर्य अन् बडेजाव! मोठमोठ्या सरदारांच्या बायकांनांसुद्धां तुझ्यापुढें माना लववाव्या लागतील! सर्व कुंजपुरप्रांतांत तुझ्यासारखी सुखी स्त्री दुसरी मिळायची नाहीं!

**चंपा**—( स्वगत ) आतां आलंच आहे ओठाशीं. एकदा पोटांतलं सगळं टाकावं ओकून यांच्यापुढं. ( उघड ) बाबा! असं कसं उलटं ह्मणतां? माझ्यासारखी दुःखी स्त्री कुंजपुरप्रांतांत काय, पण साऱ्या दुनयेंतदिखील मिळायची नाहीं. बाबा! मुद्दाम झोंपेचं सोंग घेतलेल्याला कोण कसं जागं करणार? बाबा, तुमच्या हृदयांतील भूतदयेचा झरा आटून जर अगदीं कोरडा ठणठणित झाला नसेल, पोटच्या पोरीविषयीं जर तुमच्या मनांत लवमात्र प्रेम असेल तर एकदा शांतपणं माझं बोलणं ऐकून घ्या, एवढंच या तुमच्या अनाथ पोरीचं तुमच्याजवळ पदर पसरून मागणं आहे.

**हैबतराव**—या ठरलेल्या लग्नाविरुद्ध तुला कांहीं बोलायचें नसेल, तर तुझें वाटेल तें बोलणें मी ऐकून घेईन.

**चंपा**—बाबा! असं बोलणं ह्मणजे एखाद्याला खूब डागून रडूं नको असं सांगण्यासारखंच आहे! मी आतां तुमच्याजवळ काय मागणार हें मीं न सांगतांहि तुह्माला कळून आलं नसेल असं ह्मणणं ह्मणजे तुह्मी आपले अगदीं च वेडगळ आहां असें समजल्यासारखं होईल. (पायां पडून) बाबा! असे निष्ठुर होऊं नका. माझ्यावर दया करा!

**हैबतराव**—दयाच करीन. पोटच्या मुलीवर दया करायची नाहीं, तर करायची कुणावर? तुझें कल्याण व्हावें, हीच आमच्या मनांत इच्छा असणार. उगीच कुणाच्या सांगण्यावरून भलतेसलते विचार मनांत आणून माझ्या हेतूचा विपर्यास करूं नकोस. उद्यां मी तुझ्यावर अगदीं योग्य तीच दया करीन. तसें न करीन तर ईश्वराच्या घरीं मी अपराधी होईन.

**मंजुळा**—( स्वगत ) बघा ह्मातारीचा साळसुदपणा! आपल्या मनांतला हेतु न सोडतां खारी साखर पेरायला बघते आहे!

**चंपा**—आतां स्पष्ट बोलणं भागच आलं. अगदीं जिवावर बेतल्यावर आडपडद्यानं बोलून कसं चालणार ? बाबा ! जिला जन्म देऊन तुम्हीं जगांत आणलीत, आजपर्यंत प्रेमानं लालनपालन करून लहानाची मोठी केलीत—

**हैबतराव**—अन् म्हणूनच त्याचे हे असे उपकार फेडते आहेस वाटतें कृतघ्न बेमान कारटी !

**चंपा**—अजाणाची सजाण केलीत, तिला आपल्याच हातांनीं त्या मेल्या राक्षसाच्या जबड्यांत कशी लोटतां हो ? स्वतः लावलेला विषवृक्षहि स्वतःला तोडवत नाहीं, मग प्रत्यक्ष पोटच्या पोरीचा नाश आपल्या हातांनीं करायला तुमचे हात कसे वाहतात ? बाबा ! आज माझी आई जीवंत असती, तर तिनं असं हें निर्दयतेचं कृत्य तुम्हाला खास करूं दिलं नसतं ! तिची आठवण मनांत आणा, तुमच्यावरची तिची भक्ति अन् प्रेम लक्ष्यांत घ्या अन् तिच्या लाडक्या मुलीला या भयंकर दुःखसागरांत लोटूं नका. तुमच्या या निर्दय-पणाच्या कृत्यानं स्वर्गांत तुमच्या प्रिय पत्नीच्या आत्म्याला किती दारुण यातना होतील याची थोडीशी तरी कल्पना मनांत आणून बाबा, या मातृहीन मुलीच्या जन्माचं मातेरं करण्याचा हा विचार सोडून द्या ! प्रत्यक्ष जन्मदाता बापच जर आपल्या मुलीचा गळा कापायला तयार झाला, तर त्या बिचारीनं फिर्याद तरी कुठं न्यायची ? केवळ स्वार्थाकडेच पाहून बाबा—

**हैबतराव**—कारटे ! फारच बहकलीस तूं ! कुणासमोर काय बोलते आहेस याचा कांहीं विचार ?

**चंपा**—बाबा, माझ्या सुखाची धूळधाण करण्यास प्रवृत्त होऊं नका ! पापी लोकांनां अंतकाळचा समय जितका दुःसह आणि भयंकर वाटतो, त्यापेक्षां त्या मेल्या आनंदरावाचं नांवहि मला अधिक भयंकर वाटतं ! माझ्यासारख्या कुलीन मुलींनीं बापासमोर आपल्या भावी पतीच्या अवगुणांसंबंधीं चर्चा करणं हें त्यांच्या शालीनतेस आणि मर्यादेस योग्य नाहीं खरं; परंतु मर्यादा तरी पाळायची कुठवर ? बाबा ! त्या थेरड्या जांबुवंतांत तुम्हीं पैशाशिवाय असं काय पाहिलंत ? त्या मेल्याच्या मूर्खपणावर, वृद्धत्वावर कीं त्याच्या व्यसन-प्रियतेवर लुब्ध होऊन तुम्ही आपली लाडकी मुलगी त्याला अर्पण करायला तयार झालां ?

**हैबतराव**—गप्प बस चहाटळ पोरी ! मी तुझा बाप आहें ! तुझ्यापेक्षां मला तुझ्या कल्याणाची काळजी अधिक आहे. आनंदरावांच्या दुर्गुणांबद्दल

तूं मला शिकवायला नकोस ! काय ह्मणे आजाला नातू शिकवणार ! होय ! आनंदराव अगदीं शतमूर्ख,व्यसनी,वृद्ध, जांबुवंत आहे ! अन् इतकें असूनहि मी त्याच्याशीं तुझें लग्न करणार ! मग काय तुझें ह्मणणें ?

**चंपा**—बाबा ! असे निष्ठुर होऊं नका. माझ्या शब्दांकडे लक्ष्य देऊं नका, अंतःकरणाकडे द्या. दुःखाच्या भरांत कमी अधिक शब्द माझ्या तोंडांतून आले असतील तर त्याबद्दल मी क्षमा मागत्यें. आपल्या हृदयास सहज फुटणारा प्रेमाचा झरा निष्ठुर स्वार्थाच्या प्रखर तापानं आटूं देऊं नका. तुह्मीं आपला कठोर हेतु सोडून द्यावा ह्मणून माझं अंतःकरण तुमच्या पायांकडे धाव घेण्यासाठीं माझं हृदय फोडून बाहेर निघत आहे !

**हैबतराव**—अरे वः ! तुला अलंकारिक भाषणें चांगलींच बोलतां येतात ह्मणायचें ! आतां तूं ह्मटलेंस हेंच वाक्य जर एखाद्या कवीनें पद्यांत लिहिलें, तर रसिक कवितालोलुपांचीं मनें तें वाचून अगदीं विरघळून जातील अशी माझी खात्री आहे. चंपे ! या भाषणाची तूं अगोदर किती दिवस तयारी करून ठेवली होतीस सांग बघूं ! मला नाहीं वाटत, कीं, नैसर्गिक स्फूर्तीनें इथल्या इथें तुझ्या तोंडून हें आलें !

**मंजुळा**—बाईसाहेबांच्या वतीनं मीहि आपली विनंति करत्यें कीं, त्या थेरड्याच्या पदरीं बाईसाहेबांनां घालूं नये !

**हैबतराव**—( चवताळून ) चल, ढालगज भवानी कुठली ! लहान तोंडीं मोठा घांस कशाला पाहिजे तुला ? ज्यानें त्यानें आपापल्या पायरीनेंच वागलें पाहिजे ! हिला बिघडवायला कारण तूंच ! दीड दमडीच्या मोलकरणी आमच्या सारख्यांच्या घरच्या उठाठेवी करायला लागल्या कीं खाशी तोड ! चल, चालती हो इथून ! पुनः असे लांडे कारभार केलेस तर देईन घरांतून हांकलून ! संभाळून रहा ! (तिला घालवितो.) चंपे ! मी सांगतों तें नीट ऐकून घे. तूं कांहीं बोललीस, तरी माझा एकदा झालेला निश्चय कधींहि फिरायचा नाहीं, समजलीस ? मला जगाचा अनुभव तुझ्यापेक्षां जास्त आहे. तुझें खरें कल्याण कशांत आहे हें तुझ्यापेक्षां मला चांगलें कळतें. माझें न ऐकल्यानें तुझ्या भावाची काय दशा झाली आहे ती नीट लक्ष्यांत घे. मुलांनीं आईबापांचें ऐकलें पाहिजे, अशी शास्त्राज्ञा आहे ती उगीच नाहीं ! मीं केलेल्या आज्ञेप्रमाणें निमुटपणें वागायचें हेंच तुझें सध्या कर्तव्यकर्म आहे. ऊठ ह्मटलें उठावें !

बस म्हटलें बसावें! वडील मंडळीच्या वर्तनाची किंवा आज्ञेची बरीवाईट चर्चा करणें हें तुमचें काम नाहीं!

**चंपा**—( उठून ) बाबा! आजपर्यंत मीं कधींहि तुमची अवज्ञा तिळमात्र केली नाहीं! इतकंच नाहीं, तर तुमची आज्ञा बरी वाईट याचा कांहीहि विचार न करतां ती शिरसावंद्य करित आल्यें, याला तुमचे पायच साक्ष आहेत! परंतु आतां तुमच्या आज्ञेचा माझ्या जीविताशीं संबंध आल्यामुळं तुमचं ऐकण्यापेक्षां आतां माझ्या मनाचंच मला ऐकलं पाहिजे! म्हणून मीहि आतां तुम्हाला स्पष्ट सांगल्यें, त्या मेल्या मांगाशीं लग्न करण्याविषयींची तुमची आज्ञा मला अमान्य करणं भाग आहे!

**हैबतराव**—चंपे! हें तूं मला ठांसून सांगितलेंस खरें, परंतु बापाची मुलीवर केवढी सत्ता असते याची तुला कल्पना नाहीं असें म्हटलें पाहिजे! माझा पाहिजे तो हुकूम तुला ऐकायला लावण्याचें सामर्थ्य माझ्यामध्यें आहे, हें तूं विसरतेस काय?

**चंपा**—मग बाबा! मी तरी काय करूं? असला भलता दुराग्रह सोडून देण्याविषयीं मीं तुमची इतकी विनवणी केली, कीं, ती ऐकून पाषाणासदिखील पाझर फुटला असता; परंतु तुमच्या हृदयास द्रव आला नाहीं. बाबा, माझा नाशच करायचा हेका जर तुम्हाला चालवायचा असेल, तर निदान आपल्या हातानं या आपल्या दीन मुलीला चंद्रप्रभा नदीच्या डोहांत लोटून द्या! पण त्या लांडग्याच्या स्वाधीन मला करूं नका! एवढी तरी माझी अखेरची विनंति ऐकाच! त्या मेल्या थेरड्यापेक्षां मला प्रत्यक्ष मृत्युदिखील सुखकर वाटेल!

**हैबतराव**—अस्सें! पण याबद्दल तुझी पक्की खात्री आहेना?

**चंपा**—बाबा! मी तुमचीच मुलगी आहें! तुमच्याचप्रमाणं करारीपणा अन् दृढ निश्चय माझ्याहि अंगीं आहे! त्या मेल्या जांबुवंत आनंदरावाशीं लग्न लावण्यापूर्वी मी प्राण देईन!

**हैबतराव**—काय! प्राण देणार तूं? बरें तर, त्याचीहि आतांच परीक्षा पाहूं! (तरवार उपसतो) पाहूं आतां आपला दृढनिश्चय आणि करारीपणा कसा काय दाखवतेस तूं ती! ( तरवार पुढें करून ) हं! ही घे तरवार. हिचें टोंक चांगलें तीक्ष्ण आहे. हिनें तुझें काम सहज होईल अशी माझी खात्री आहे!

**चंपा**—जिवावर उदार झालेल्या एका स्त्रीच्या हातांत असलें घातुक शस्त्र द्यायची तुमची इच्छा आहे काय बाबा?

हैबतराव—ही पहा जिवावर उदार झालेली स्त्री ! झालें ? खाल्लीस अखेरीस कच ? हः हः !

चंपा—होय बाबा! अझूनहि तुमचं मन पालटेल, अशी मला आशा आहे !

हैबतराव—तर मग तरवार अन् आनंदराव या जोडीपैकीं आनंदरावच तूं पत्करतेस म्हणायचें ?

चंपा—तूर्त मी यांतलं एकहि पत्करित नाहीं ! जेव्हां अगदीं माझी निराशा होईल, तुमच्या हृदयास पाझर फोडण्याजोगे शब्दच नाहींत अशी माझी पक्की खात्री होईल, तेव्हां तुमच्या या तरवारीच्या मदतीशिवाय दुसऱ्या कोणत्याहि तऱ्हेनं तुमच्यापासून आणि त्या मेल्यापासून आपली सुटका करून घेतल्याखेरीज मात्र मी रहाणार नाहीं !

हैबतराव—अस्सें अस्सें ! अझून तुला आशा आहे म्हणायची ! आपल्यां पुढच्या बेताविषयीं तूं मला वेळींच सावध केलेंस, हें एका अर्थी उत्तम झालें ! ( तिचा हात धरून ) आनंदराव येईपर्यंत तुझ्याविषयीं मला आतां चांगलीच काळजी घेतली पाहिजे. तोंपर्यंत हें कडीकुलूप तुझें कसें काय रक्षण करतें तें पाहूं या ! हं, चल जा आंत. मोठ्या शास्त्राच्या अन् नीतीच्या गोष्टी सांगत होती मला ! ( तिला कोंडून ठेवतो. ) आतां मला अन् आनंदरावाला शिव्या देत खुशाल बैस आंत !

[ पडदा पडतो. ]

## अंक दुसरा.

### प्रवेश पहिला.

[ स्थल—संभाजीरावाच्या वाड्यांतील तारेचा महाल. तारा पत्र वाचित येते, व तिच्यामागून गुलाब येते, असा प्रवेश. ]

**गुलाब**—ताईसाहेब ! तें पत्र वाचायचं तरी किती वेळ ? मला वाटतं, तें आल्यापासून ही आपली तिसावी आवृत्ति असेल त्याची !

**तारा**—अग वेडे ! असं मधुर, मोहक, प्रेमरसानं थबथबलेलं पत्र हजार वेळ, नव्हे लाखों वेळ वाचलं, तरी मनाची तृप्ति का व्हायची आहे ? शुद्ध, अकपट प्रेम करणाऱ्या प्रियकराची प्रणयपत्रिका वाचतांना प्रत्येक वेळेस कांहीं निरनिराळाच आनंद अनुभवास येतो ! आनंदाचा कुणाला कधीं वीट का येणार आहे ? अहाहा ! किति सुंदर, रसाळ, गोड पत्रिका ही ! ( चुंबन घेते. )

**गुलाब**—पण त्यांत प्रेम पाघळण्याची पद्धत एकच !

**तारा**—म्हणून यांतली मधुरता कांहीं कमी होत नाहीं !

**गुलाब**—मला नाहीं ताईसाहेब, आपल्यासारखं वाटत ! ज्यांत कधीं कांहींच फेरबदल होत नाहीं, तें नेहमीं गोड लागणार नाहीं ! आपल्या अगदीं आवडीचा जरी पदार्थ असला, अन् तोच तोच आपल्याला नेहमीं मिळत गेला, तर माणसाला त्याचा कधीं तरी वीट अन् कंटाळा आल्याखेरीज रहात नाहीं. या सर्व साधारण नियमाला आशुकमाशुकांच्या प्रणयपत्रिकाहि अपवाद नाहींत ! एकाच हातच्या, एकाच धर्तीवर लिहिलेल्या वीसपंचवीस प्रणयपत्रिका एकाच मनुष्याच्या वाचनांत आल्या, तर त्यांतल्या पहिल्या दोनचार पत्रिका कदाचित् मिटक्या मारण्यासारख्या मधुर लागतील; परंतु पुढं त्यांचा कंटाळा आल्याखेरीज रहाणार नाहीं, हें खास !

**तारा**—गुलाब ! भारीच बाई बोलभांड आहेस तूं ! तूं आणखी किती जरी बोललीस, तरी तुझं म्हणणं मी कबूल करणार नाहीं ! माझ्या प्रियकराचं प्रत्येक पत्र, नव्हे प्रत्येक पत्राचं प्रत्येक अक्षर वाचून माझ्या हृदयांत ज्या अवर्णनीय आनंदाच्या लहरी उठतात, त्यांचं सुख तुझ्यासारख्या अरसिक अकलखंदकेला सांगून काय उपयोग ? त्यांतील रहस्य कळायला कांहीं तरी स्वतःचा अनुभव यावा लागतो. ( पत्र वाचूं लागते; गुलाब हंसते. ) खुशाल हंस गुलाब ! होय, तुझ्या म्हणण्याप्रमाणं ही माझी एकतिसावी आवृत्ति आहे ! ( पत्र पुनः वाचते. )

" तारे ! प्रियतमे ! या अखिल विश्वांतील सर्व सुखद आणि सुंदर वस्तूंचें तूं सार आहेस ! तूं सर्व सद्गुणांचें निवासस्थान आणि लावण्याचें निधान आहेस! माझ्या जीविताचा तूं आधार आहेस! तुझ्या विरहवन्हींत हल्लीं मी जें जीवन कंठित आहें तें मृत्यूप्रमाणें आहे ! जगाच्या दृष्टीनें मी जीवंत असलों तरी खरोखर मी मेल्याप्रमाणेंच आहें! अशी जीवन्मृतता मी आणखी किती दिवस सहन करूं? मम हृदयेश्वरी ! हा पंचेचाळीस दिवसांचा विरह प्रेमाच्या राज्यांत पंचेचाळीस हजार युगांप्रमाणें आहे ! आज काय होईल तें होवो; तुझ्या वदनचंद्राचें दर्शन घेण्यासाठीं अत्यंत उत्कंठित झालेल्या माझ्या चित्त-चकोराचे हेतु पूर्ण करण्यासाठीं मी आज रात्रीं तुझ्याकडे येण्याचा निश्चय केला आहे! ही गोष्ट फक्त रंभाजीरावाला मात्र कळविली आहे. आज सायंकाळीं काळोख पडल्यावर नेहमींच्या माझ्या खुणेची वाट पहात रहा.

आपल्या पंचप्राणांपेक्षां तुला अधिक मानणारा,

तुझा नम्र दास,

झुंजारराव. "

**गुलाब**—ऐकलं बरं ताईसाहेब, पत्र ! आपणासारखी सुंदर रंभा आणि वर इतकी संपत्ति मिळत असतां कोण असं लिहिणार नाहीं ! ताईसाहेब, झुंजाररावांच्या जागीं जर मी असलें, तर आणखी कित्ती कित्ती तरी लिहिलं असतं मीं त्या पत्रांत !

**तारा**—आहेसच मुळीं तूं तशी विद्वान् ! तूं काय लिहिलं असतंस अधिक या पत्रांत, सांग बरं !

**गुलाब**—झुंजाररावांनां प्रेमाचीं पत्रं चांगलीं लिहितां येत नाहींत, असंच म्हटलं पाहिजे ! स्त्रिया त्यांच्या रूपाच्या स्तुतीनं भुलतात हें प्रेमशास्त्रांतलं साधं तत्त्वदिखील त्यांनां माहीत नसावं, हें खरोखर मोठंच आश्चर्य आहे ! आपल्या डोळ्यांची मीं आकाशांत लखलखणाऱ्या नक्षत्रांशीं तुलना केली असती; तसंच आपल्या दांतांची पांढऱ्या शुभ्र कुंदकळ्यांशीं, ओठांची पोंवळ्यांशीं, गळ्याची शंखाशीं, देहकांतीची गोरोचनाशीं—

**तारा**—बरं बरं चहाटळ मेली ! पुरे झाली तुझी विद्वत्ता ! असल्या खोट्या स्तुतीनं तुझ्यासारख्या स्तुतिप्रिय बायकाच फुगतील ! मला तर असं वाटतं कीं, प्रणयिजनांत सत्यनिष्ठा हा गुण अवश्य पाहिजे ! मग एक वेळ त्यांच्यांत वाक्चातुर्य नसलं तरी चालेल !

**गुलाब**—बरं ताईसाहेब! आपलं ह्मणणं जरी खरं मानलं घटकाभर, तरी झुंजाररावांच्या पत्रांत आपली स्तुति आहेच कीं! मग आपल्यावरचं त्यांचं प्रेम खोटंच तर!

**तारा**—गुलाब! मजवरील त्यांच्या अढळ प्रेमाचा आणखी काय पुरावा पाहिजे? केवळ माझ्यासाठीं आपल्या बापाच्या आग्रहाविरुद्ध कमळेशीं लग्न करण्याचं त्यांनीं नाकारलं, तेव्हां त्यांच्या बापानं त्यांनां नाहीं नाहीं ती भीति दाखविली, काय वाटेल तें केलं, परंतु त्यांनीं केवळ माझ्यासाठीं बापाचं तें बोलणं ऐकलं नाहीं! त्या लग्नाच्या पेंचांतून सुटण्याकरतां आपला जीवहि धोक्यांत घालून मुराररावाशीं मारामारी करून माझ्यासाठीं त्यांनीं अज्ञातवासहि पत्करला! आणखी प्रेम प्रेम तें काय असतं? आणि आतांहि, त्यांचा जिकडे तिकडे बारकाईनं शोध चालला असतां, त्यांनां धरून देण्याबद्दल मोठमोठीं बक्षिसं लागलीं असतां, फक्त माझी भेट घ्यावी याच हेतूनं आपल्या प्राणाचीहि पर्वा न करतां ते इकडे येण्याचं साहस करताहेत ना? अन् इतकं सारं तुला ठाऊक असून तूं असं ह्मणावंस?

**गुलाब**—वहावा! ताईसाहेब! माझं बोलणं आपण मनापासूनच समजलां वाटतं! इतके दिवस आपल्या सेवेंत राहून आपणावरील झुंजाररावांच्या प्रेमाबद्दल मला परीक्षा का होणार नाहीं? पण ताईसाहेब! आपला हा हेतु सिद्धीस कसा जाणार? कारण, आपल्या आत्याबाईनीं मला नुकतंच असं सांगितलं कीं, बाबासाहेबांचा बेत म्हणे आपल्याला देवाला वहायचा आहे! मीहि तेव्हांपासून याविषयीं आपणाला विचारीन विचारीन ह्मणत होत्यें. खरंच ताईसाहेब! आहे काय प्रकरण हें?

**तारा**—तुला सांगायला कांहीं हरकत नाहीं ह्मणा. बाबांचा बेत तसा आहे खरा. मलासुद्धां बाबांनीं ही गोष्ट नुकतीच दोनतीन महिन्यांपूर्वी कळविली. तेव्हां मीं याविषयीं आत्याबाईंनां विचारलं. त्यांनींच मला हें सारं सांगितलं. बाबांचीं मुलं वांचतना, तेव्हां माझ्या आजोबांनीं मी व्हायच्या सुमारास कुलस्वामीला नवस केला कीं, 'आतां होईल ती मुलगी तुला वाहीन; शंभूचीं मुलं वांचूं देत.' कर्मधर्मसंयोगानं मी तेवढी वांचल्यें; पण माझ्या पाठचीं भावंडं वांचलीं नाहींत.

**गुलाब**—तर मग बरं ह्मटलं तर कुलस्वामी कांहीं त्यांच्या नवसाला पावला नाहीं.

**तारा**—होय, तसं म्हटलं तरी हरकत नाहीं; पण मी तर वांचल्यें ना ? माझे आजोबा मोठे धार्मिक होते. त्यांनीं आपल्या अंतकाळीं बाबांना मला देवाला वहायला सांगितलं, अन् बाबांनीं तें कबूल केलं.

**गुलाब**—मोठं नवलच म्हणायचं हें !

**तारा**—तेव्हांपासून बाबांच्या मनाची स्थिति चमत्कारिक झाली. बाबाहि बरेच धर्मभोळे आहेत; परंतु आपल्या एकुलत्या एक मुलीनं सारा जन्म पतीवांचून कंठावा, हें त्यांच्या मनाला फारसं रुचत नव्हतं. एकीकडे आजोबांना त्यांच्या अंतकाळीं दिलेलं वचन व स्वतःचा धर्मभोळेपणा, अन् दुसरीकडे मुलीच्या खऱ्या सुखाची इच्छा, यांचा बाबांच्या मनांत तेव्हांपासून मोठा झगडा लागला आहे. अद्यापपर्यंत बाबांनीं मला देवाला वाहिलं नाहीं, याचं कारण तरी हेंच! परंतु दोनतीन महिन्यांपूर्वी आजोबांनीं स्वप्नांत येऊन बाबांना त्या गोष्टीची आठवण देऊन दरवाडल्यामुळं आजोबांना दिलेलं वचन लवकरच पुरं करण्याचा त्यांनीं निश्चय केल्याचं दिसतं. ( हंसून ) बाकी, बाबांचा हा निश्चय अमलांत कसा येणार कोण जाणे!

**गुलाब**—( हंसून ) खरंच तें ताईसाहेब! आपल्यासारखी घरभेदी मंडळी बाहेरच्या लोकांनां सामील झाल्यावर बाबासाहेबांचा हा बेत तडीस जाणार कसा? देव करो, अन् झुंजारराव या किचाटांतून लवकर सुटोत! पण ताईसाहेब! बाबासाहेबांच्या संमतिशिवाय झुंजाररावांशीं आपलं लग्न झालं, तर ते संतापणार नाहींत का ? अन् त्यांनां वाईट नाहीं का वाटणार ?

**तारा**—पहिल्यानं ते जरा संतापतील, अन् त्यांनां वाईट वाटेल, हें खरं आहे; पण पुढं त्यांची नीट समजूत घातल्यावर त्यांना आनंदच होईल, अशी माझी खात्री आहे. अगोदर मात्र त्यांच्या विरुद्ध कांहीं बोलतां कामा नये, किंवा कांहीं दर्शवितां कामा नये. त्यांच्यानं आपण होऊन आपल्या मनावरचं धर्मभोळेपणाचं पटल दूर करवत नाहीं, तें माझ्या हिताकरितां मला दूर केलं पाहिजे. माझ्या या कृतीचा परिणाम बाबांनां अन् मला अंतीं इष्टच होणार, अशी माझी खात्री आहे. लोकांच्या दृष्टीनं सध्या मी त्या भोळ्या सांबाला फसविलं असं दिसेल; परंतु दूरवर नजर देऊन पहाणाऱ्या विचारी माणसांनां तसं खास वाटणार नाहीं! हो, या मनाला भुरळ घालणाऱ्या पत्राच्या नादांत हिरोजीला मी विसरूनच गेल्यें! जा गुलाब, त्याला घेऊन ये इकडे.

**गुलाब**—होय ताईसाहेब, आतां नुसता बोलण्याचा सुकाळ करून टाकील स्वारी !

[ जाते.

**तारा**—(स्वगत) खरोखर, आजचा हा दिवस मोठा चमत्कारिक उगवला आहे. इतक्या दिवसांनीं माझ्या प्रियकराची भेट होणार, म्हणून आजचा दिवस मला मोठा भाग्याचा अन् आनंदाचा वाटतो आहे; परंतु इकडे येण्याच्या साहसांत स्वारीवर भयंकर संकट येण्याचा संभव असल्यामुळं फार काळजीहि वाटते आहे! कांहीं विघ्न न येतां आज स्वारी जर इथं सुखरूप आली तर अंबाबाईची मी सोन्याच्या नारळानं ओटी भरीन.

[ गुलाब व हिरोजी येतात. ]

**गुलाब**—ही आली ताईसाहेब, हिरोजीरावांची स्वारी !

**तारा**—कसं काय हिरोजी ? ठीक आहे ना तब्येत ?

**हिरोजी**—नाहीं ताईसाहेब !

**तारा**—म्हणजे ? होतं आहे काय तुला ?

**हिरोजी**—तसा कांहीं तापबिप नाहीं येत मला ताईसाहेब! वाटेच्या श्रमांमुळें सध्या तब्येत जरा बिघडून गेली आहे, एवढेंच माझें म्हणणें ! ( गुलाबला एकीकडे ) गुलाब ! तूं अशी कांहीं मारू दिसते आहेस, कीं यंव् !

**तारा**—एवढी अगदीं तब्येत बिघडून जाण्यासारखे तुला वाटेचे श्रम तरी कसले झाले ? तूं इकडे आलास तरी कसा ?

**हिरोजी**—मी होय, घोड्यावरून ताईसाहेब! परंतु चालत आलों असतों तर जे श्रम झाले असते, त्यापेक्षां दुप्पट श्रम घोड्यावरून आल्यामुळें झाले! माझें तें श्यामवर्ण वारू पूर्वी कुणा तरी हरदासाचें असावें, असें वाटतें ! आपल्या पूर्वीच्या धन्याच्या संगतीनें तें मोठें धार्मिक बनून गेलें होतें ! वाटेंत कुठें त्याच्या नजरेस मोठासा दगड पडला म्हणजे तें त्याला देव समजे अन् मनांतल्या मनांत 'पुंडलीक वर दे हरिविठ्ठल!' असें म्हणून भुईवर लोटांगण घाली. त्याला या समाधींतून उठवतां उठवतां माझ्या नाकीं अगदीं नऊ येत ! चुचकारून, मारूनमुटकून त्या तट्टाला उठवून थोडेंसें चालावें, तों पुनः त्याचें येरे माझ्या मागल्या ! शेवटीं कंटाळून दिलें एकदाचें त्याला पिटाळून अन् मी आलों चालत ! ( गुलाबला एकीकडे ) गुलाब ! तुझ्या एका चुंबनानेंच माझे सारे श्रम नाहींसे होतील पहा !

**गुलाब**—(हिरोजीस) अस्सं! या खेपेला प्रेमाचा जोर बराच दिसतो आहे!

**तारा**—बरं, तुझे धनी कुठपर्यंत आले आहेत ?

**हिरोजी**—( न ऐकतां गुलाबला एकीकडे ) पोरी, ताईसाहेब इथें आहेत ह्मणून, नाहीं तर माझें प्रेम तुला तेव्हांच करून आलें असतें !

**तारा**—हिरोजी! मीं काय विचारलं तें ऐकलंस नाहीं वाटतं ? तुझे धनी कुठपर्यंत आले आहेत ?

**हिरोजी**—इथून दोन कोसांवर, गांवापासून अगदीं एकीकडे असें महादेवाचें एक देऊळ आहे, तेथें धनीसाहेब उतरले आहेत. आतां थोड्याच वेळांत काळोख चांगला पडल्यावर ते रंभाजीरावांच्या घरीं पोंचतील अन् तसेच इकडे येतील. ( गुलाबला एकीकडे ) गुलाब ! तुझे चुंबन घ्यायला माझे ओंठ पहा कसे फुरफुरताहेत ते !

**तारा**—त्यांची प्रकृति ठीक आहे ना हिरोजी ?

**गुलाब**—( हिरोजीस एकीकडे ) वहावा ! इथून गेल्यापासून उसनं प्रेम दाखवायचं कसब तुह्मी चांगलं शिकलांत ह्मणायचं !

**हिरोजी**—( गुलाबाला एकीकडे ) छे छे ! मुळींच नाहीं !

**तारा**—( घाबरून ) काय ह्मणतोस हिरोजी ? झुंजाररावांची प्रकृति ठीक नाहीं ? होत काय त्यांनां ? सांग लवकर. देवा ! या अभागिनीसाठीं त्यांनां विदेशांत असे हाल काढावे लागताहेत ना ?

**हिरोजी**—ताईसाहेब ! अशा घाबरूं नका. धनीसाहेबांची प्रकृति बिघडली आहे खरीच, पण आपण समजतां आहां तशी मात्र बिघडलेली नाहीं !

**तारा**—ह्मणजे ?

**हिरोजी**—ह्मणजे त्यांनां प्रेमाचा विकार झाला आहे ! प्रेमानें ते अगदीं बेहोष होऊन गेले आहेत ! ! कुंजपूर सोडल्यापासून धनीसाहेबांनीं सारखें आपलें चिंतन चालविलें आहे ताईसाहेब ! एखादा साधुसुद्धां परमेश्वराचें चिंतन इतक्या एकनिष्ठपणानें करित नसेल ! ध्यानीं, मनीं, स्वप्नीं सदासर्वकाळ धनीसाहेबांनां आपली मूर्ति दिसते आहे ! ( गुलाबकडे सप्रेम दृष्टीनें पाहत ) धनीसाहेबांची अशी अवस्था झालीच पाहिजे, हें मी आपल्या स्वतःच्या अनुभवावरून सांगतों ! धनीसाहेब माझ्यापेक्षां दर्जानें किती तरी मोठे आहेत खरे, पण प्रेमाच्या व्यवहारांत सार्वभौम राजा आणि एखादा भणंग भिकारी दोघेहि सारखेच !

तारा—पण हिरोजी! त्यांच्या अगदीं मनांतले हे विचार तुला कसे कळून आले?

हिरोजी— मनुष्याच्या मनांतले विचार कळायला कांहीं ज्योतिषच शिकायला नको ताईसाहेब! मनुष्याचे सहज येणारे शब्द म्हणजे त्याच्या मनाचें प्रतिबिंब असतें, असें म्हणायला कांहीं हरकत नाहीं. या नियमावरून पहातां, धनीसाहेबांनां आपल्याशिवाय कांहीं दिसत नाहीं आणि भासत नाहीं, अशी माझ्या मनाची पक्की खात्री होऊन चुकली आहे. फार नको ताईसाहेब! आपल्याला यासंबंधाच्या धनीसाहेबांच्या एकदोन गोष्टी सांगतों, म्हणजे मी सांगतों हें अगदीं खरें आहे असें आपल्यालाहि वाटेल. इथून गेल्यानंतर कांहीं दिवसांनीं एकदा धनीसाहेबांनां थंडी भरून ताप आला. तेव्हां 'आमच्या शेजारच्या बागेंतून माळ्याकडून तारा मागून आण; आणि तो मला करून दे म्हणजे माझा ताप उतरेल,' असें धनीसाहेबांनीं मला सांगितलें. 'तारा' म्हणजे 'ओला चहा' असें मी समजलों. (गुलाबकडे पाहून) परंतु बागेंत जातांना गुलाबबद्दलचे विचार माझ्या मनांत घोळत होते; त्यांच्या भरांत बागेच्या माळ्याला मीं म्हटलें 'माळी दादा, मला थोडे गुलाब दे पाहूं!' माळ्यानें माझ्या हातांत थोडीं गुलाबाचीं फुलें दिलीं. गुलाबच्या विचारांत तन्मय होऊन गेल्यामुळें माझी चूक माझ्या लक्ष्यांत न येतां धनीसाहेबांपुढें मीं तीं फुलें नेऊन ठेविलीं. 'ओल्या चहा' ऐवजीं मीं गुलाब आणले हें पाहतांच, माझ्या नेहमींच्या एकनिष्ठ सेवेची चहा न करतां धनीसाहेबांनीं तश्या तापांत उठून माझी कणीक यथास्थित मऊ केली!

गुलाब— ठीक झालं! मोर नाचतो म्हणून लांडोरहि लागली नाचायला! त्याचं प्रायश्चित्त असंच मिळायचं!

हिरोजी— (गुलाबला एकीकडे) असें काय? बरें आहे! पुढेंमागें याचें उट्टं निघेल बरें का, आपलें लग्न झालें म्हणजे! (तारेस) ताईसाहेब! दुसरी एक अशीच धनीसाहेबांची गोष्ट सांगतों आपल्याला. एक दिवस धनीसाहेबांचे एक नवीन झालेले स्नेही त्यांच्याजवळ सतार वाजवित बसले होते. इतक्यांत धनीसाहेबांनीं मला हुकूम केला 'हिरोजी! जा लवकर तारा आण!' सतारीची तार तुटली असेल असें समजून धावत जाऊन मी बाजारांतून सतारीच्या तारा आणून धनीसाहेबांनां दिल्या; त्याबरोबर धनीसाहेबांनीं माझे कान धरून इतक्या जोरानें ओढले कीं, माझ्या कानांच्या आतां ताराच

बनतात असें मला वाटलें ! माझ्या कधीं पाहण्यांत नाहीं, परंतु त्या दिवशीं तरी धनीसाहेबांनां गांजाबिजाची चांगलीच तार चढली होती खास !

तारा— ( हंसून ) तर मग माझ्यामुळं तुला बराच त्रास सोसावा लागतो म्हणायचं हिरोजी !

हिरोजी— तें कांहीं विचारूं नका ताईसाहेब ! इथून गेल्यापासून धनीसाहेबांचे सर्व व्यवहार 'तारा' या एका शब्दानेंच चालतात, असें म्हटलें तर फारसें खोटें होणार नाहीं ! कधीं कधीं मला ते 'तारा' या नांवानेंच हांक मारतात. मीहि आतां या नांवाला इतका निढावलों आहें कीं, कांहीं मनांत न आणतां या शब्दाला मी हांक देतों. ताईसाहेब ! आपलें 'तारा' असें नांव ठेवण्यांत आपल्या आईबापांची मोठी चूक झाली आहे, असें मी तरी म्हणतों ! 'तारा' या मोहक नांवाला न भुलतां त्यांनीं एखाद्या देवीचें किंवा असेंच कांहीं तरी पवित्र नांव आपल्याला ठेवलें असतें, तर फार चांगलें झालें असतें !

तारा— कां बरं !

हिरोजी— धनीसाहेबांच्या तोंडांतून आपलें नांव मी दिवसांतून इतक्या वेळ ऐकतों कीं, तें जर एखाद्या देवीचें असतें तर मला किती तरी कोटियज्ञ केल्याचें पुण्य मिळून त्याच्या जोरावर मीं इंद्राचें पद त्याच्यापासून हिसकावून घेतलें असतें, यांत कांहीं शंका नाहीं !

गुलाब— ( हिरोजीस एकीकडे ) अहाहा ! इंद्रमहाराजांचा मोहराच बघून घ्या !

तारा— अरे हो ! मुख्य माहिती तुला विचारायला मुळीं विसरल्येंच ! इथून गेल्यावर अजूनपर्यंत तुम्ही होतांत कुठं ?

हिरोजी— ताईसाहेब !—

तारा— पण नको सांगूस ! या कचाट्यांतून सुटून झुंजारराव स्वतंत्रतेनं फिरूं लागतपर्यंत हा प्रश्न तुला अथवा त्यांनां विचारणं बरं नाहीं !

हिरोजी— हेंच मी आपल्याला विचारणार होतों ताईसाहेब !

तारा— तुम्ही कुठंहि असा, तूं सांगितलेल्या सतारीच्या वगैरे हकीगतीवरून तुम्ही तिथं मोठ्या मौजेनें दिवस काढित होतां, असं दिसतं !

हिरोजी—(गुलाबकडे सप्रेम दृष्टीनें बघत) होय, ताईसाहेब, मोठ्या मौजेनें !

**तारा**—असें ! नाचरंगांत अगदीं चैन उडवित होतां ना ?

**हिरोजी**—होय ताईसाहेब ! अगदीं रंग उडवित होतों अन् काय !

**गुलाब**—( हिरोजीस एकीकडे ) कां ? भांगबिंग झोंकून तर नाहींना आली स्वारी ? ताईसाहेब काय विचारताहेत इकडे लक्ष्य आहे का तुमचं ?

**तारा**—अस्सं का ! मी जवळ नसतांनासुद्धां स्वारी नाचरंगांत अगदीं, दंग होऊन चैन उडवित होती ना ? मग मघाशीं तूं सांगितलेलं खोटं तर !

**हिरोजी**—चैन ? ताईसाहेब ! कसली चैन ?

**तारा**—तर तू आतां काय ह्मणालास ?

**हिरोजी**—छे छे ! ताईसाहेब ! असा भलताच अर्थ नका करूं. आपल्या विरहांत धनीसाहेबांनां क्षणभर देखील चैन पडत नाहीं, असें माझें ह्मणणें !

**तारा**—अरे लबाडा ! गुलाबकडे गुंतलं आहे वाटतं तुझं लक्ष्य ! अरे, आतां नुकताच ना तूं ह्मणालास कीं, आह्मी अगदीं चैन रंग उडवित होतों ह्मणून ? अन् इतक्यांत, गुलामा, आपलं बोलणं फिरवितोस ?

**हिरोजी**—काय ह्मणतां ताईसाहेब ! आह्मी रंग उडवितों ह्मणून ? छे छे ! अशी कल्पनाहि मनांत नका आणूं ! ह्या रंगाचा काय घोटाळा आहे तो सांगतांना ताईसाहेब, आपणाला पुनः माझ्या तोंडानें माझीच फजीति सांगणें भाग आलें आहे ! आपल्या विरहानें तापलेल्या मनाला कांहीं तरी विरंगुळा ह्मणून धनीसाहेबांनीं आपली तसबीर काढायचा उद्योग अलीकडे चालविला होता. परवां नुकतेंच या तसबिरीसाठीं धनीसाहेबांनीं मला तांबडा रंग विकत आणायला सांगितला; त्याप्रमाणें मीं तो आणला. पण तो गडबडींत कुठें ठेवला कीं उडवला कोण जाणे ! माझ्या दुर्दैवानें धनीसाहेबांनीं माझेजवळ तो पुनः मागितला, आणि मला तो त्यांना देतां आला नाहीं ह्मणून धनीसाहेबांनीं त्या तांबड्या रंगाकरतां माझी पाठहि चांगली रंगवून लाल केली ! तेंच माझ्या मनांत तेव्हांपासून सारखें घोळतें आहे. आपण 'रंगा'विषयीं मला विचारलें तेव्हां मी हेंच गेलों असेन बोलून गैरशुद्धींत ! त्याबद्दल मला क्षमा करा ताईसाहेब ! वहावा ! धनीसाहेब आणि चैन ! ह्यासें ! त्याचें आणि तिचें अगदीं वितुष्ट ! केवळ आपल्या मूर्तीच्या चिंतनांत सर्वकाळ निमग्न रहाणें हीच अलीकडे धनीसाहेबांची चैन होऊन बसली आहे. बिचाऱ्यांच्या स्थिती-कडे पाहून मला कींव येते !

**तारा**—अरेरे! माझ्याकरतां त्यांचे काय हाल अन् वनवास हे! शृंगारराव आज मला भेटणार ही अत्यंत आनंदाची बातमी तूं मला कळविलीस यासाठीं ही आंगठी मी तुला देत्यें, ही घे—

**हिरोजी**—कशाला कशाला ताईसाहेब! उगीच—( आंगठी घेतो. )

**तारा**—अन् त्यांनां सांग कीं, ठरल्या वेळीं तारा आपली अगदीं चातकाप्रमाणं वाट पहात बसली आहे.

**हिरोजी**—बरें आहे, ताईसाहेब!

[ तारा जाते.

**गुलाब**—( स्वगत )स्वारीपासून ती आंगठी आपल्याला कांहीं तरी युक्ति करून पटकावली पाहिजे!

**हिरोजी**—( आंगठी बोटांत घालून ) अहाहा! काय हिचें पाणी! आमच्या बापजाद्यांनीं कधीं असली पाहिली देखील नसेल! आज सकाळीं कुणाचें बरें तोंड पाहिलें होतें मीं? काय चमकते आहे अस्मादिकांच्या बोटांत!

**गुलाब**—कां? हिरोजीराव! आतां इकडे पाह्यचंदिखील नाहीं का म्हटलं? होय! आहे ठाऊक! आपल्याला ताईसाहेबांनीं आंगठी दिली ती मला माहीत आहे. आतां माझ्याशीं बोललांत तरी आपली योग्यता कांहीं कमी व्हायची नाहीं! स्वारीची ऐट तर पाहून घ्या!

**हिरोजी**—वारे वा! माझा हात किती मोहक दिसतो आहे हा! काय तरी याचा वर्ण–काय नाजुक बांधा!—पण छेः, पुरुषांचे हात नाजुक नाहींत उपयोगी! नाजुक नव्हे–पण–पण–कांहीं कां असेना! एकंदरींत, माझा हा हात अप्रतिम सुंदर आहे! इतकीं वर्षें माझा हा हात आहे, पण त्याचें सौंदर्य आज मला कळतें आहे! नुसत्या हाताचें जर इतकें सौंदर्य–तर अस्मादिकांचें सर्व शरीर म्हणजे मदनाचा बोलता चालता पुतळाच म्हटला पाहिजे! वास्तविक, एखाद्या सरदारांत अन् माझ्यांत आतां काय कमी आहे? राव राजेबहादूर हिरोजीराव अशासारखी कांहीं तरी पदवी असली म्हणजे झालें!

**गुलाब**—अहो सरदार, राव राजेबहादूर, इंद्रमहाराज, मदनाचे पुतळे! म्हटलं, या गरीब दासीकडे आपली नजर जाईल का थोडी?

**हिरोजी**—लाड आहे झालें अस्मादिकांची! धनीसाहेबांशीं लग्न लागून ताईसाहेब आमच्या धनीण झाल्या म्हणजे असलीं हीं बक्षिसें आम्हाला हरहमेश मिळणार! पण आमची कसली आली आहे लाट! बी कोण आमची

पट्टराणी होणार ती आह्मांला हे दागिने पचूं देणार थोडीच! ती रागावून रुसून आमच्याकडून दागिने उपटणार अन् ओझ्याच्या गाढवासारखे पुनः आह्मी कफल्लक ते कफल्लकच! असो, ती तरी आमच्यामुळें नटून सजून गोकुळांतल्या राधेसारखी चटकचांदणी दिसणार, हें काय कमी भाग्य आहे!

**गुलाब**—अहो, गोकुळांतले कनय्यालाल महाराज! तुमच्या या आंगठी-वाल्या लहानग्या बोटाचा अपमान होत नसेल तर ही आपली राधा आपल्या-जवळ थोडीशी विनंति करीन ह्मणते!

**हिरोजी**—ओ हो, राधाराणीसाहेब! आपली स्वारी मघांपासून येथें आहे, हें माझ्या लक्ष्यांतच नव्हतें! बरें, आपण जें कांहीं बोलणार आहां तें माझ्याशीं कीं माझ्या बोटाशीं, हें सांगा पाहूं राणीसाहेब!

**गुलाब**—अगबाई! राणीसाहेब? ताईसाहेबांनीं तुह्माला दिलेल्या आंगठी-मुळं मी राणीच्या पदाला चढल्यें ह्मणायची!

**हिरोजी**—या आंगठीमुळें असेंच नव्हे कांहीं! जो तो आपल्या घरचा राजाच असतो; तेव्हां मीहि राजा आहें! आतां लवकरच आपलें लग्न झाल्यावर तूं माझी राणी होणारच कीं नाहीं? पुढें 'राणी' ही पदवी द्यायची ती अगोदर, दिली एवढेंच काय तें!

**गुलाब**—त्याप्रमाणंच पुढं ती आंगठी मला तुह्मी देणार, ती आतांच द्या, ह्मणजे झालं! ह्मणजे तुमच्याच ह्मणण्याप्रमाणं एक तर गोकुळांतली चटक-चांदणी राधा एव्हांपासून तुमच्या दृष्टीस पडेल, अन् गाढवावरचं ओझं उतरलं ह्मणजे त्याला जसं हायसं वाटतं तसं तुह्मालाहि लवकरच वाटेल! शिवाय, ही आंगठी आपल्या लग्नाच्या वाङ्‌निश्चयाची खूण होईल, ती निराळीच!

**हिरोजी**—तसें-तसें नव्हे! पण-पण-गुलाब! इतक्या लवकर लग्न करावें कीं नाहीं हें अझून मीं ठरविलें नाहीं!

**गुलाब**—अस्सं काय लफंगेराव? आतां लवकर आपलं लग्न झाल्यावर तूं माझी राणी होशील, असं कोणत्या तोंडानं आतां इतक्यांत तुह्मी ह्मणालांत? बरं आहे, नका देऊं मला ती आंगठी! मला आहे ठाऊक त्या सटव्या मंजुळेला देणार आहां ती!

**हिरोजी**—हं हं! अशी भलतीच कांहीं तरी समजूत करून घेऊं नकोस! मंजुळेची अन् माझी ओळख आहे फार जुनी; तुझी आहे नवी. जुन्या ओळखीच्या माणसाला लांचलुचपत देण्याचें मला कांहीं कारण नाहीं!

तुला मीं ही आंगठी दिली असती, पण ती माझ्या हातांत असली ह्मणजे धनी-साहेबांच्या ती नेहमीं नजरेस पडेल, अन् ताईसाहेबांची आंगठी ह्मणून माझ्यावर त्यांची मेहरबानी राहून माझ्या नेहमींच्या माराचा खुराक कमी होईल. मिळून अखेरीस फायदा तुझाच !

**गुलाब**—चला चला ! फसवे कुठले ! असल्या युक्तीनं माझी समजूत होईल असं वाटण्याइतके तुह्मी शहाणे आहां वाटतं ?

**हिरोजी**—अशी उगीच रागावूं नकोस ! ( जवळ जाऊन ) हं, आज इतक्या दिवसांनीं आपल्या गांठ पडली आहे, आतां एक—

**गुलाब**— ( रागावून ) त्या सटवीला आंगठी अन्— महाराज ! इतकी सलगी दाखवूं नका माझ्याजवळ ! ( ढकलून देते. ) तोबऱ्याला पुढं अन् लगामाला मागं ! जशी देणावळ तशी धुणावळ ! जा: ! !

**हिरोजी**—अरे वा ! ह्मणींचा अन् त्याबरोबरच आपल्या शहाणपणाचाहि तूं माझ्यावर पाऊस पाडलास ! जनान्यांतल्या दासीसारखें कुरबाज उत्तर देतेस !

**गुलाब**—दरबारांतल्या नोकरासारखं झोंकदार बोलतां !

**हिरोजी**—हं, चालूं दे, असेंच प्रासाला प्रास भाषण ! गुलाब ! मी तुला तुझ्या हिताची गोष्ट सांगतों. अशी वर्दळीवर येऊं नकोस ! मी आहें रंगेल गडी ! तुझ्याशीं फाटलें तर माझें दुसरीकडे कुठें तरी सांधेल बघ !

**गुलाब**—अन् सांधलं तर माझं गेल खेटर !

[ तारा येते. ]

**तारा**—गुलाब ! हिरोजीला किती वेळ ठेवलं आहेस हें उगीच ? एखादे वेळेस बाबा पट्दिशीं इकडे आले ह्मणजे केवढी पंचाईत होईल, याची तुला कल्पना तरी आहे ? 'लवकरच परत येतों,' असं तुळाजीला सांगून ते बाहेर गेले आहेत, पण ते इकडे कधीं येतील याचा नेम नाहीं.

**गुलाब**—( स्वगत ) झुंझारराव इथं स्वत:ला भेटायला आले असते, अन् दोघांच्या गुल्गुल् गोष्टी चालल्या असत्या, ह्मणजे ताईसाहेबांनां हाच वेळ एका क्षणासारखा वाटला असता ! बडे लोकांचं हें असंच ! आपलं झालं ह्मणजे झालं, दुसऱ्याकडे लक्ष्य देतो कोण !

**तारा**—हिरोजी ! रंभाजीरावांकडे ते आतां आले असतील नाहीं ? जा आतां तूं. त्यांनां सांग कीं, मी वाट पहात आहें. गुलाब ! जा त्याला पोंचवून ये.

**हिरोजी**—ठीक आहे ताईसाहेब! येतों तर आतां.

[ गुलाब व हिरोजी जातात.

**तारा**—गेला एकदाचा हा रेंगाळणारा कंटाळवाणा दिवस! आह्मा प्रणयिजनांची जिवलग मैत्रीण निशादेवी आह्मांला सहाय्य करण्याकरतां कशी वेगानं धावून येत आहे! हिच्या मदतीनं माझे झुंझारराव मला भेटणार, या सुखकर विचारानं रात्रीचं कृष्णस्वरूपहि मला प्रियच वाटतं! ठीकच आहे! प्रियजनांचे दोषहि मनुष्यांनां गुणांप्रमाणं वाटतात! ( इतक्यांत गुलाब आंतून 'अगबाई! चोर! चोर! धावा धावा! खून! खून!' असें ओरडते. त्यासरशी दचकून ) अगबाई! काय हें मी ऐकल्यें? गुलाबच ओरडली ही? झुंजाररावांचा पाठलाग करताहेत वाटतं! अगबाई! माझ्यासाठीं त्यांच्यावर हा प्रसंग! झुंझारराव! या अभागिनोला भेटायला इतकं साहस करून कशाला हो आलां? आई अंबाबाई! तुलाच माझी काळजी आतां! तुझ्या नांवानं— ( गुलाब धावत येते तिला पाहून ) कां? काय झालं गुलाब! तूं अशी ओरडलीस कां? अशी माझ्याकडे टवकारून बघूं नकोस! सांग सांग लवकर! काय झालं गुलाब?

**गुलाब**—( श्वास टाकित ) सांगल्यें ताईसाहेब सगळं! हिरोजीरावांनां पोंचवून त्यांच्याकडे पहात थोडा वेळ मी दारांत उभी होल्यें. इतक्यांत एक इसम मला लगटून दारांतून आंत घुसला. त्याबरोबर माझ्या हातांतला दिवा विझाला ह्मणून मी घाबरून ओरडल्यें. त्याच्या दोन्ही हातांमध्यें प्रेतासारखं कांहीं तरी होतं खास. मी तशीच तडक धावत इथं आल्यें. तो तें प्रेत घेऊन इकडेच येतो आहे!

**तारा**—काय प्रेत? गुलाब! काय ह्मणल्येस? प्रेत! अंबाबाई, ते झुंझारराव नसोत ह्मणजे झालं! ह्मणतात ना, वैरी न चिंती तें मन चिंती!

**गुलाब**—हा पहा आलाच तो!

**तारा**—( घाबरून ) नको नको! माझ्यानं तसलं कांहीं नाहीं पहावणार! गुलाब! तूं इथं रहा. मी जाल्यें इथून. तूं घे समजावून सगळं.

[ जाते.

[ दौलतराव चंपेला घेऊन येतो व तिला एका कोचावर ठेवतो.]

**दौलतराव**—( गुलाबला ) बाई, मी कुणी रानदांडगा आहें असें तुह्माला वाटेल! पण माझेवर प्रसंगच असा आला, कीं, तुमच्या घरांत तुमच्या

परवानगीवांचून एकदम शिरणें मला भाग पडलें. या बाईला आतांचे आतां कुठें तरी सुरक्षित ठिकाणीं घाईनें आणि गुप्तपणें नेलेंच पाहिजे होतें. अशा वेळीं तुमचें घर जवळच दिसलें, तेव्हां दुसरातिसरा कांहीं एक विचार न करतां मी येथें शिरलों. तुह्मी मला याबद्दल क्षमा करा. कुणावरहि असा प्रसंग आला असतां त्याला मदत करणें हें सर्वांचें काम आहे. तेव्हां माझ्या या आडदांडपणाबद्दल तुह्मी माझेवर रागावणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. या बाईला जबर मूर्च्छा आली आहे. ही कोण आहे, तसेंच ही माडीवरून खालीं कां पडली, याबद्दल मला कांहींसुद्धां माहिती नाहीं. ( स्वगत ) तसेंच हें अप्सरेसारखें सौंदर्यहि माझ्या नजरेस न पडतें तर फार चांगलें झालें असतें ! ( उघड ) बाई, तुह्मी दयाळु आहां असें समजून मी हिला शुश्रूषेकरतां तुमच्या स्वाधीन करतों. थोडा वेळ स्वस्थपणानें ही पडली ह्मणजे अल्प उपायांनीं खास शुद्धीवर येईल. मी हिला तुमच्या स्वाधीन करून जातों. कांहीं वेळानें ही शुद्धीवर आल्यावर हिला हिच्या मर्जीप्रमाणें हिच्या घरीं किंवा दुसऱ्या कुठें पोंचविण्याची तजवीज करण्याकरितां थोड्या वेळानें मी इथें परत येईन. रस्त्यांतली रहदारीहि तोंपर्यंत कमी होईल. मी इथें राहणें योग्य नाहीं. या प्रसंगीं घरच्या पुरुषांपेक्षां बायकांचें सहाय्य विशेष होण्यासारखें असल्यामुळें घरच्या मालकांची मी चौकशी करित नाहीं. बाई, या वाड्याच्या मालकिणीचें नांव काय बरें ?

**गुलाब**—ताराबाई, रावसाहेब !

**दौलतराव**—तुह्मीच का त्या ?

**गुलाब**—नाहीं, मी त्यांची दासी.

**दौलतराव**—बरें, मी जातों आतां. थोड्या वेळानें मी परत येईन. हिची नीट काळजी घ्या बरें !

[ गुलाबला दोन मोहरा देऊन निघून जातो.

**गुलाब**—काय दोन मोहरा ! याला ह्मणावं बक्षीस ! असो. आतां ताईसाहेबांनां सर्व हकीगत कळवून यांच्या शुश्रूषेला लागलं पाहिजे.

[ तारा येते. ]

**तारा**—( स्वगत ) काय त्या वेळेस माझी स्थिति झाली ! अंबाबाईनंच प्रसंग निभावला ! त्या गृहस्थाच्या हातांवर एक स्त्री आहे असं मला दिसतांच माझी केवढी तरी काळजी दूर झाली ! ( उघड ) गुलाब ! तूं काय केलंस हें ?





**दौलतराव**—दुसरा तिसरा कांहीं एक विचार न करतां मी येथें शिरलों. तुह्मी मला याबद्दल क्षमा करा.

( पृष्ठ ४० )

त्या अनोळखी मनुष्याला माझं नांव सांगितलंस ? तुला विचार ह्मणून कसा तो नाहींच ! दाराआड राहून मी सारं ऐकत होत्यें—गुलाब ! अशी हात जोडून स्वस्थपणं उभी काय राहिलीस ? जा धाव, थंड पाणी आण लवकर ! अगबाई ! कोण हें ? ही तर माझ्या झुंजाररावांची बहीण चंपाताई ! काय तरी प्रसंग हिच्यावर हा ! ( गुलाब जाऊन पाणी आणते व चंपेच्या मस्तकावर शिंपडते. ) गुलाब ! पंखा घेऊन वारा घालूं लाग पाहूं ! चंपाताई ! चंपाताई ! बोला हो ! सावध व्हा ! भिऊं नका ! इथं दुसरं कुणी नाहीं !

**चंपा**—( भ्रमांत ) दादा ! नकोरे त्या चांडाळाच्या मला स्वाधीन करूं ! मी तुझ्या पायां पडल्यें. दादा ! दादा ! मी–मी—

**तारा**—अगबाई ! काय तरी चमत्कारिक बोलणं हें !

**चंपा**—( सावध होऊन ) हें काय ! कुठं आहें मी ?

**तारा**—तुमच्यापेक्षांहि तुमच्या दुःखानं दुःखित होणाऱ्या अशा एका तुमच्या मैत्रिणीजवळ तुह्मी आहां ! चंपाताई ! अझून मला ओळखलं नाहीं तुह्मीं ? मी तुमची मैत्रीण, तारा !

**चंपा**—तारा वहिनी ! मी भ्रमांत तर नाहीं ? यावेळीं मी तुमच्याजवळ इथं कशी आल्यें ? कोणत्या दयाळु देवाला करुणा येऊन त्यानं मला त्या भयंकर संकटांतून वांचविलं अन् इथं आणलं ?

**तारा**—चंपाताई ! तो कुणी स्वर्गींचा देव नाहीं, या पृथ्वीवरचाच तो एक मानवी देव आहे ! पण तुह्मी इथं कशा आलांत, तसंच हा सारा प्रकार काय आहे, हें मात्र मला कांहीं ठाऊक नाहीं !

**चंपा**—हं, आतां आठवलं मला सारं. ज्या भयंकर संकटांतून माझी तूर्त तरी सुटका झाली आहे, त्याच्या विचारानं अन् या साऱ्या विलक्षण प्रकारानं मी इतकी भांबावून गेल्यें कीं, आतांपर्यंत माझ्या त्या रक्षणकर्त्याचं मला विस्मरणच पडलं !

**तारा**—मला सांगतां येण्यासारखी आहे का तुमची ही हकीगत ?

**चंपा**—तुह्माला न सांगायला काय झालं ? त्यांपैकीं तुह्माला थोडीशी माहीतसुद्धां आहे. त्या थेरड्या आनंदरावाशीं माझं लग्न करण्याचं बाबांनीं ठरविलं आहे ही गोष्ट मीं तुह्माला सांगितली आहेच. त्या चांडाळाची धिंडका तिकडे सारंगपुरास गेली होती—तिकडेच कां नाहीं त्याच्यावर यमाची धाड आली कोण जाणे !—तिकडून मेला माझा गळा कापायला उद्यां इथं यायचा आहे,

अन् उद्यांच्या कुमुहूर्तावर त्याच्याशीं माझं लग्न होणार, असं बाबांकडून मला आजच कळलं. तेव्हां बाबांनीं हा दुष्ट निश्चय सोडावा म्हणून मीं त्यांची परोपरीनं विनवणी केली, कडू बोलून पाहिलं, परंतु त्यांच्या कठीण हृदयाला द्रव येईना! तेव्हां मींहि त्यांनां साफ सांगितलं कीं, प्राण देईन परंतु त्या मेल्या थेरड्याशीं लग्न म्हणून करणार नाहीं! माझा हा निश्चय ऐकतांच बाबांनीं मला कुठं पळून जातां येऊं नये म्हणून माझ्या खोलींत मला कोंडून ठेवलं! तोंपर्यंत कोणत्या तरी युक्तीनं हें घाणेरडं लग्न चुकवितां येईल अशी मला आशा होती; परंतु आज मला त्यांनीं कोंडून ठेवल्यापासून माझी सारी आशा मावळली. बाबांचा निश्चयी स्वभाव तुम्हाला पक्का ठाऊकच आहे! आतां उद्यां त्या मेल्या जांबुवंतावरोबर आपलं लग्न झाल्याखेरीज रहात नाहीं असं मला पक्कं वाटलं. संध्याकाळच्या काळोखाबरोबरच मला चोहोंकडे निराशेचा काळोख दिसूं लागला! तेव्हां मृत्यूनं तरी या दारुण संकटांतून माझी सुटका करावी म्हणून प्राणांत करून घेण्यासाठीं मीं खोलीच्या खिडकींतून खालीं रस्त्यावर उडी टाकली.

**तारा**—पण तुम्ही स्वतःच ही हकीगत सांगत आहां, तेव्हां तुमचा तो हेतु सिद्धीस गेला नाहीं हें उघड आहे! तेव्हां तुम्ही वांचलां कशा? तुम्हाला कांहीं दुखापत तर नाहीं ना झाली?

**चंपा**—नाहीं. जन्मदाता बाप माझ्यावर निष्ठुर झाला होता खरा, परंतु दैव कांहीं निष्ठुर झालं नव्हतं; म्हणून त्याच वेळेस तिथून जाणाऱ्या एका गृहस्थानं मला वरचेवर अलग आपल्या हातांवर झेललं. हा चमत्कार तर खरा, पण माझ्या दैवबलानं घडला! पहिल्या प्रथम ते गृहस्थ माझे बाबाच आहेत असं वाटून भयानं मी बेशुद्ध झाल्यें.

**गुलाब**—तर मग त्याच गृहस्थानं तुम्हाला इथं आणलं! अहाहा काय त्यांचं स्वरूप! जणूं प्रत्यक्ष मदनच! तारुण्य तर त्याच्या अंगीं मुसमुसत होतं. त्याच्या चालीरीतीवरून तो कुणी बडा सरदार दिसतो! माझ्या साऱ्या जन्मांत मीं असला उदार पुरुष पाहिला नाहीं. तुमची नीट काळजी घेण्याबद्दल मला त्यांनीं दोन मोहरा दिल्या! माझ्या मनांत त्यांनां थांबवून घ्यायचं होतं, पण तेच इथून तुम्हाला माझ्या स्वाधीन करून तांतडीनं निघून गेले.

**तारा**—गुलाब! तूं जराशी इथून जा बरं बाहेर. (गुलाब जाते.) त्या गृहस्थानं तुम्हाला इथंच कसं नेमकं आणलं?

**चंपा**—तें कांहीं मला नक्की नाहीं सांगतां येणार! पण आपलं तर्कानं मला वाटतं तें सांगलें. मी बेशुद्ध पडल्यें असतां ते गृहस्थ कांहीं उपाय करण्यासाठीं मला आपल्या हातांवर घेऊन लगबगीनं कुठं जात होते. मध्यंतरीं थोडा वेळ मी शुद्धीवर आल्यें. हें पाहून त्यांनाहि आनंद झाला असं मला दिसलं. इतक्यांत रस्त्यांत आमच्या दादाचा नोकर हिरोजी माझ्या दृष्टीस पडला, अथवा निदान तसा मला भास झाला! तेव्हां दादाहि जवळपास कुठं तरी असला पाहिजे, असं वाटून भयानं मी पुनः बेशुद्ध झाल्यें. शुद्धीवर येऊन पहाल्यें, तों मी तुमच्या महालांत तुमच्याजवळ आहें! मी पुनः बेशुद्ध झाल्यें, हें पाहून त्या गृहस्थानं घाबरून ताबडतोब जवळच्या घरीं मला आणलं असावं. कर्मधर्मसंयोगानं हें घर तुमचंच होतं! मी इथं कशी आल्यें याबद्दल असा माझा तर्क आहे अन् तो हजार हिश्शांनीं खरा असला पाहिजे!

**तारा**—( हंसून ) पहा बाई! गुलाबच्या सांगण्यावरून तर तो प्रतिमदनच दिसतो आहे. मीहि त्याला ओझरतं पाहिलं आहे, त्यावरून गुलाबचं ह्मणणं बरोबर आहे असं मला वाटतं. तुमच्याप्रमाणं मीहि माझा एक तर्क तुह्माला सांगूं का? तारा मैत्रकानं अथवा चक्षूरागानं तुमचं मन इतक्या थोड्या अवकाशांतहि त्या मदनावर बसून त्याची रति व्हायची तुमच्या मनांत प्रबळ इच्छा उत्पन्न झाली आहे! खरं सांगा हो, मी ह्मणल्यें तें खरं कीं नाहीं?

**चंपा**—होय वहिनी! तुमच्यासारख्या जिवलग मैत्रिणीजवळ ही हकीगत चोरून ठेवण्यांत काय अर्थ आहे! त्यांनीं माझेवर केलेल्या अपार उपकारांमुळं उत्पन्न झालेल्या कृतज्ञताबुद्धीमुळं ह्मणा, किंवा त्यांच्या अप्रतिम रूपसौंदर्यामुळं ह्मणा, त्यांच्यावर माझं मन बसलं आहे, हें कांहीं खोटं नव्हे! परंतु ते पुनः माझ्या दृष्टीस पडायचे नाहींत अशी मला भीति वाटते, इतकंच काय तें! ( सुस्कारा टाकते. )

**तारा**—चंपाताई! खिन्नपणानं असे अश्रु कां बरं गाळतां?

**चंपा**—पुनः कदाचित् मी बाबांच्या तावडींत सांपडेन, अशी मला भीति वाटते!

**तारा**—या संबंधानं माझा कांहीं उपयोग होण्यासारखा वाटतो का तुह्माला? मी तुह्माला वाटेल तें सहाय्य करण्यास तयार आहें!

**चंपा**—तुमच्या महालांत दोनतीन दिवस गुप्तपणं लपून रहाण्याची जर तजवीज कराल, तर तुमचे माझ्यावर मोठे उपकार होतील!

**तारा**—कांहीं हरकत नाहीं. तुम्ही इथं खुशाल रहा. तुम्हाला इथं अगदीं गुप्तपणानं रहातां यावं अशी मी तजवीज करीन.

**चंपा**—तुमचे फार उपकार झाले वहिनी ! गुलाबला थोडा वेळ इकडे पाठवून द्याल तर बरं होईल.

**तारा**—ठीक आहे, देतें तिला पाठवून. ( स्वगत ) मलाहि बाबा बाहेरून आले कीं नाहीं तें पाहिलं पाहिजे. आले असले तर झुंजाररावांनां इथं फार वेळ राहवून घेतां कामा नये.

[ जाते.

**चंपा**—आजच्या एका दिवसांतच माझ्या आयुष्यांतल्या किती महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या ! त्यांची मूर्ति दिसल्यापासून आजच मंजुळेजवळ केलेल्या माझ्या वल्गना फोल होऊं पहात आहेत ! एकदा पाऊल टाकलं खरं, आतां कच खाऊन उपयोगी नाहीं ! कसंहि करून त्यांचा शोध लावलाच पाहिजे ! माझ्या आयुष्याच्या जिण्याची आतां हीच पहिली पायरी आहे—

[ गुलाब येते. ]

**गुलाब**—काय हुकूम आहे बाईसाहेब ?

**चंपा**—गुलाब ! तुला एक नाजुक कामगिरी सांगायची आहे.

**गुलाब**—तुमच्या सेवेला मी सादर आहें बाईसाहेब ! तुमची वाटेल ती आज्ञा मी इमानाइतबारानं बजावीन.

**चंपा**—म्हणूनच तुझ्यावर मी भरंवसा टाकायला तयार झाल्यें आहें. ही घे माळ तुला. तुझ्या गळ्यामध्यें ही चांगली शोभेल !

**गुलाब**—छे छे बाईसाहेब ! या बक्षिसाशिवाय मी तुमचं वाटेल तें काम करायला तयार आहें.

**चंपा**—तें मी जाणून आहें ! घे ती आतां अन् घाल गळ्यांत—अश्शी ! बरं, गुलाब! ज्या गृहस्थांनीं मला इथं आणलं, ते जर पुनः कधीं तुझ्या दृष्टीस पडले, तर त्यांनां तूं ओळखशील का ग ?

**गुलाब**—हो बाईसाहेब ! अगदीं हजारजणांतून त्यांनां ओळखून काढीन ! कोणताहि पुरुष माझ्याशीं दोन शब्द बोलला पुरे, कीं त्याला मी कधींहि विसरत नाहीं! त्यांतून, असल्या राजबिंड्या तरुण पुरुषाला एकदा पाहिल्यावर कोणतीहि बायको त्याला कधीं जन्मांत तरी विसरेल का ? ते जेव्हां इथून गेले, तेव्हां ‘ लवकरच मी इथं परत येईन ’ असं सांगून गेले.

**चंपा**—काय ह्मणालीस तूं गुलाब ? इथं लवकरच परत येतों असं सांगून गेले ? खरोखर, तूं मला हें आनंदामृतच पाजलंस ! ते इथं आले तर त्यांचं मी चोरून दर्शन घेईन—पण कांहीं कारणासाठीं मला त्यांनां प्रत्यक्ष भेटतां येणार नाहीं. मीं जर त्यांनां पत्र लिहिलं, तर तें तूं त्यांनां नेऊन देशील ?

**गुलाब**—हो बाईसाहेब ! त्यांत काय कठिण आहे ?

**चंपा**—या घरांत नको हो देऊं पण ! त्यांच्यामागं तूं बुरखा घेऊन जा, अन् इथून दूर अंतरावर त्यांनां पत्र दे. तें पत्र माझ्याकडून आलं आहे हें त्यांनां कळतां कामा नये हो !

**गुलाब**—प्रेमाच्या व्यवहारांत तुह्मी मला अगदीं नवखीच समजतां वाटतं, बाईसाहेब ! इथं ताईसाहेबांच्याकडे नोकरीस राहिल्यापासून या कामाचा विशेष सराव नाहीं इतकंच कायतं ! पण विशेष सराव नसला तरी मी कुठं फसायची नाहीं ! तशी मी पक्की आहें !! तुह्मी पत्र लिहून द्या, अन् बाकीचं सारं माझ्याकडे सोंपवा !

**चंपा**—बरं तर, मला पत्र लिहायचं साहित्य आणून दे पाहूं.

**गुलाब**—( आणून ) हं, हें घ्या बाईसाहेब !

**चंपा**—आतां लिहून देतें पहा ! ( पत्र लिहूं लागते. )

**गुलाब**—( स्वगत ) आजच्यासारखा जर दररोजचा दिवस उगवेल तर काय बहार होईल ! आज सकाळीं मीं कोल्ह्याचं तोंड पाहिलं होतं खास ! सकाळीं ह्मणण्यापेक्षां संध्याकाळींच ह्मणणंच योग्य ! हे संध्याकाळचे कोल्होबा ह्मणजे आमचे इंद्रमहाराज हिरोजीरावच म्हणायचे ! त्यांचं तें काळ्या खापरासारखं तोंड बघितल्यापासून त्या गृहस्थांनीं दिलेल्या दोन चकचकीत मोहरा, अन् ही ठसठशीत मोत्यांची माळ इतकीं आमच्या पदरांत पडलीं ! शिवाय, हें तसंच एक काम मजकडे आलं आहे ! यांचं हें पत्र त्यांनां नेऊन दिलं, कीं, पुनः सोन्याच्या दोन चकचकीत मोहोरा माझ्या हातांत पडल्याच ह्मणून समजावं ! एकून मदनमहाराजांचं काम करणारांचे श्रम फुकट जात नाहींत !

**चंपा**—हं, हें झालं पहा पत्र लिहून. पण, त्यांनां हें घर पुनः सांपडतं कीं नाहीं कोण जाणे !

**गुलाब**—अन् नाहीं सांपडलं ह्मणून काय झालं ? हें कुंजपुर सोडून जर ते कुठं गेले नसतील, तर त्यांनां मी खात्रीनं वाटेल तिथून शोधून काढीन ! त्यांनीं मला दिलेल्या मोहरा अन् पुढं त्यांच्याकडून मिळणारं बक्षीस यांच्या

वासानं, कुत्रा धन्याला वाटेल तिथून शोधून काढतो त्याप्रमाणं, मीहि त्यांनां शोधून काढीन ! ( पत्र चोळींत ठेवते. )

[ तारा येते. ]

**तारा**—गुलाब, जा. बाबा अझून बाहेरून आले नाहींत; पण तूं त्यांच्या टेहळणीवर रहा. ते इकडे येतात असं वाटलं, तर ताबडतोब धावत येऊन मला कळीव. ( गुलाब जाऊं लागते तों दरवाजावर थापा ऐकूं येतात. ) थांब गुलाब ! होय, ही झुंजाररावांचीच खुण ! जा त्यांनां दरवाजा उघडून आंत घे अन् तशीच आपल्या कामाला जा.

[ गुलाब जाते.

**चंपा**—काय ह्मटलंत वहिनी तुह्मीं ? दादा इथं आला आहे !

**तारा**—होय, दरवाजावर ह्या त्यांच्याच खुणेच्या थापा !

**चंपा**—तर मग वहिनी ! आतां माझा जीव तुमच्या हातांत आहे ! तुह्माला माझ्या गळ्याची शपथ आहे, दादांची शपथ आहे—मी इथं आहें हें दादाला कोठल्याहि तऱ्हेनं कळूं देऊं नका ! दादा इथं आज येणार आहे हें जर मला अगोदर कळतं, तर मी इथं राहिल्येंच नसत्यें. वहिनी ! कसंहि करा, पण मला त्याच्या दृष्टीस पडूं देऊं नका !

**तारा**—तुमच्या इच्छेविरुद्ध मी त्यांनां कशाला कळवूं ? पण तुह्मी इथं आहां असं जर त्यांनां कळलं तर त्यांत तुह्माला कसलं भय ?

**चंपा**—हें असं कसं विचारतां तुह्मी ? दादा जातीचा अस्सल मराठा आहे. बाबांच्या इच्छेविरुद्ध, त्यांनीं ठरविलेलं लग्न चुकवण्याकरतां मी इथं लपून राहिल्यें आहें हें त्याला खपायचं नाहीं. माझ्या या वर्तनानं आपल्या कुळाला अक्षम्य डाग लागला, असं समजून तो मला बाबांच्या स्वाधीन करील; किंवा इथल्याइथं मला ठारसुद्धां मारील ! ह्मणून-ह्मणून-वहिनी—

**तारा**—कांहीं हरकत नाहीं. तुह्मी काळजी करूं नका. माझेवर विश्वास ठेवून अगदीं निर्धास्त रहा. आतां माझा गळा जरी कुणीं चिरला, तरी तुह्मी इथं आहां ही गोष्ट कुणालाहि-प्रत्यक्ष झुंजाररावांनांहि-मजकडून कळायची नाहीं. मग त्यामुळं मजवर वाटेल तें संकट येवो ! हं, ते आले ! चला, या खोलींत जा झटकन् !

**चंपा**—वहिनी ! तुमच्या वचनावर विश्वास ठेवून मी जात्यें, पण लक्ष्यांत ठेवा, एका शब्दानं माझा सुगावा दादाला लागला, कीं माझे प्राण गेलेच !

**तारा**—मजवर विश्वास ठेवा. प्राणांतींहि तुमचा विश्वासघात मजकडून होणार नाहीं ! [ चंपा खोलींत जाते.

[ वेष पालटलेला झुंजारराव येतो. ]

**तारा**—अगबाई ! झाला वाटतं घात ! हे कोण हे ? ( घाबरून त्याच्याकडे टक लावते. )

**झुंजारराव**—( वेष काढून) हा तुझा दास झुंजारराव ! आतां तरी पटली ओळख ?

**तारा**—( धावत जाऊन आलिंगन देऊन ) अगबाई ! माझे पंचप्राण झुंजारराव ! प्रिया !

**झुंजारराव**—तारे ! माझ्या प्राणा ! माझ्या वेषानें तूं फसलीस ना ? प्रेमानें ज्यांचीं अंतरंगें एक झालीं आहेत तीं बाह्यवेषानें थोडींच फसतात ! चंद्रावर अभ्रें आलीं तरी कमलिनी त्याच्या उदयानें फुलणारच !

**तारा**—पुरे झालं गडे आतां मला हिणवणं ! काय माझ्यासाठीं साहस केलं हें आज ! काय आपलं मजवर हें प्रेम ! धन्य आहें मी !

**झुंजारराव**—तारे, मी हद्दपार होऊन तुझ्या विरहाग्नीच्या असह्य ज्वालेंत, भयंकर कष्टांत दिवस काढित असतां तुझ्या या झुंजाराशिवाय तुझ्या मनांत जर इतर कसलेच विचार आले नसतील, तर सर्व पृथ्वीवर माझ्यासारखा धन्य मीच ! तुझ्या हृदयांत मला अढळ स्थान मिळालें असेल तर मीं भोगलेल्या कष्टांपेक्षां शेंकडोंपटीनें दारुण कष्ट मी आनंदानें भोगीन !

**तारा**—काय तरी बाई भलतंच विचारणं हें ! या हृदयांत आपणाशिवाय दुसऱ्या कुणाला यत्किंचित् तरी जागा मिळणं शक्य आहे का ? माझ्या तोंडूनच वदवण्यांत काय विशेष आहे ? तरी पण आपली इच्छाच असली तर आपणाला सांगलें, कीं, माझ्या हृदयांत आपली ही मनोहर मूर्तिच रात्रंदिवस खेळत असते. आपल्या मनाला याबद्दल थोडा तरी संशय कां बरं यावा ? मी आपणाला स्पष्ट सांगलें कीं, मी मूर्तिमंत सत्य आहें, मूर्तिमंत पातिव्रत्य आहें, मूर्तिमंत प्रेम आहें ! मी हें गर्वानं बोललें असं मात्र समजूं नये. ओघाला आलं ह्मणून सांगणं भाग पडलं.

**झुंजारराव**—मग माझ्या प्रेमाला तुझें हृदय हें अगदीं योग्य स्थल मिळालें आहे ! प्रिये, तारे ! तुझ्याबद्दलच्या प्रेमरसानें माझें हृदय कसें तुडुंब भरून गेलेलें आहे, त्याचें वर्णन करणें केवळ अशक्य आहे ! तरी पण तुझ्या मुख-

चंद्राच्या दर्शनाचा लाभ त्याला किती तरी दिवसांत न झाल्यामुळें अलीकडे कधीं कधीं त्याच्यावर संशयाच्या लहरी उठत असतात हेंहि तुझ्यापासून मी लपवित नाहीं. हा माझ्या स्वभावाचा दोष ह्मण, पण आहे खरा !

**तारा**—हें असं काय बरं बोलायचं ? माझ्याकडून संशय येण्यासारखं कांहीं घडलं आहे का ?

**झुंजारराव**—छे छे ! तसें मी मुळींच ह्मणत नाहीं. पण खऱ्या प्रेमाला भीतीच्या जागा फार असतात आणि भीतीला किती तरी डोळे असतात ! तरी तुझ्या प्रेमांत संशय येण्यासारखं खरोखर कांहीं नाहीं. पण अशा आनंदाच्या प्रसंगीं असला हा घाणेरा विषय हवा कशाला ? तारे, तूं माझा कलिजा— ( दारावर थाप ऐकूं येते. ) हें काय ? दारावर थाप कोण मारतो आहे ? ( पुनः थाप. )

**तारा**—छे ! मी तर कांहीं नाहीं ऐकलं तें ? ( पुनः थाप. )

**झुंजारराव**—तारे, याचा अर्थ काय ? रात्रीच्या वेळीं तुझ्या दारावर थापा कोण मारतो आहे ?

**तारा**—एखाद्या खिडकीचीं दारं वाऱ्यानं वाजत असतील झालं ! अशा वेळीं दरवाजावर कोण थापा मारणार आहे माझ्या ?

[ आंतून ' ताराबाई ! अहो ताराबाई !' असा शब्द होतो. ]

**झुंजारराव**—तुझ्या नांवानें स्पष्ट हांका मारणारे शब्द देखील वाऱ्याचेच वाटतें ?

[ गुलाब येते. ]

**गुलाब**—( तारेला एकीकडे ) ताईसाहेब, मीं खिडकींतून पाहिलं, दरवाजाशीं कुणी गृहस्थ उभा आहे. मला वाटतं, चंपाबाईला ज्यानं इथं आणलं, तोच तो ! दार उघडून घेऊं का मी त्याला आंत ?

**तारा**—( गुलाबला एकीकडे ) गुलाब ! तो यावेळीं आंत आला तर केवढा अनर्थ होईल याची तुला कल्पना तरी आहे ? सटवे ! मघाशीं कांहीं विचार न करतां त्याला माझं नांव दिलंस सांगून, त्याचा हा सारा परिणाम !

**झुंजारराव**—काय झाला या कुंटणाबाईचा नवीन कानमंत्र ?

**गुलाब**—आपल्यासारख्यांच्या तोंडीं असले घाणेरडे शब्द शोभत नाहींत, बरं !



**झुंजारराव**-थांब! तुझी ही दुष्ट इच्छा पुरी करायला त्याला जीवंतच नाहीं ठेवीत! ( पृष्ठ ५१. )

**तारा**—( झुंजारराव जाऊं लागतो त्याला धरून ) छे छे ! नाहीं ! नाहीं मला सोडून जायचं !

**झुंजारराव**—त्याला तुम्ही तिथें किती वेळ तिष्ठत ठेवणार ? नेहमींप्रमाणें आपली हीहि खेप फुकट जायची नाहीं अशा भरंवशावर तो आला, यांत त्या बिचाऱ्याचा काय बरें अपराध ? माझें पत्र तुला एकदम आल्यामुळें त्याला आगाऊ सूचना देण्यास तुला संधि सांपडली नाहीं, यांत तुझा तरी काय अपराध ? जाऊं दे मला ! तुमच्या भेटीला मी विघ्न कशाला इथें ! ( जाऊं लागतो. त्याला तारा धरते. )

**तारा**—गडे, असा उगीच भलताच संशय घेऊं नये! (स्वगत) काय प्रसंग हा! आतां करूं तरी काय ?

**गुलाब** ( स्वगत ) तेच गृहस्थ हे! चंपाबाईचं पत्र नेऊन द्यावं त्यांनां आतां.

[ जाते.

[ दारावर मोठमोठ्यानें थापा ऐकूं येतात. ]

**झुंजारराव**—कान असले तर नीट ऐक ! तूं विलंब लावते आहेस तसतसा तो अधीर होत चालला आहे! मी आतां इथून गेलों तर तुझाला बरें वाटणार आहे, मग मला धरून ठेवून वरपांगीं प्रेम दाखविण्याचा हा खटाटोप कशाला ? जाऊंद्या बाईसाहेब, मला! तिकडे दरवाज्यांत तो वाट पहात उभा आहे, त्याची सुटका करा ! जा ! ( जाऊं लागतो. )

**तारा**—माझ्याशीं त्याचं कांहीं काम नाहीं !

**झुंजारराव**—काय ह्मणतेस ? तुझ्याशीं काम नाहीं, तर मग या घरांत तुझ्या नांवाची दुसरी कुणी स्त्री आहे ? पण उगीच वितंडवाद हवा कशाला ? तूं ह्मणतेस तें खरें आहे, अशी माझी खात्री करून दे ! उघड तो दरवाजा ! येऊं दे त्याला आंत ! तुझ्याशीं जर त्याचें खरोखर काम नसेल, तर तुमचें संभाषण मीं ऐकलें तर काय हरकत आहे ? माझी खात्री व्हायची असेल तर फक्त याच-याच गोष्टीनें होईल !—कां ? विचार कसला करतेस ? तर मग खास-खास कांहीं तरी इथें काळेंबेरें आहे! बोल बोल! पकडली कीं नाहीं तुला? नाहीं-नाहीं इथें माझ्यानें आतां रहावत ! सोड मला ! पलीकडल्या सज्जावरून उडी टाकून त्या नीचाला दरवाज्यांतच प्रायश्चित्त देतों ! होय—सज्जाचा रस्ता हाच ! ( तारेपासून निसटून चंपा असलेल्या खोलीकडे जातो. )

**तारा**—हां हां ! तिकडे जाऊं नका–तिकडे जाऊं नका ! ! (स्वगत) आतां करूं तरी काय? चंपाताई इथं आहे हें यांच्यापासून आतां लपवूं तरी कसं?

**झुंजारराव**—कां बरें ? तुझ्या प्रियकराच्या प्राणांची तुला भीति वाटली वाटतें ?

**तारा**—नका हो असं भलतंच बोलूं ! देवाची शपथ घेऊन सांगतें, आपणाशिवाय दुसऱ्या कुणाला या हृदयांत मीं कधींहि स्थान दिलं नाहीं ! आपल्या प्राणांशिवाय मला कुणाची काळजी असणार ? गडे, पण मोठ्यानं बोलूं नका. बाबांच्या कानांवर जर का यांतला एक शब्द गेला, तर आपला सर्वस्वी घात होईल ! नका—तिकडे जाऊं नका ! तो रस्ता बाबांच्या दिवाणखान्याकडे जातो. (स्वगत) प्रसंग मोठा विलक्षण आहे! जर हे आंत गेले तर चंपाताई यांच्या दृष्टीस पडेल ! बरें जर बाहेर गेले, तर त्या गृहस्थाची अन् यांची मारामार होऊन खुनापर्यंत मजल यायची ! (उघड) भलताच संशय मनांत आणूं नका. शांतपणानं धीर धरा! (खिडकीजवळ जाऊन) गृहस्था! तूं कोणीहि ऐस, एवढ्या रात्रीं माझ्या नांवानं मुर्दाडपणानं हांका मारून लोकांनां माझ्याविषयीं भलतेसलते संशय घेण्याला कारण करून देतो आहेस ! इथून तूं या क्षणीं निघून जा, नाहीं तर याचा परिणाम फार भयंकर होईल !

(आंतून–' क्षमा करा बाईसाहेब ! आपली आज्ञा मला मान्य आहे; पण आज सायंकाळीं जेव्हां या महालांतून मी गेलों—' )

**झुंजारराव**—छान् ! छान् !

**तारा**—(स्वगत) खात्रीनं तोच हा गृहस्थ ! (उघड) मला वाटतं, तुम्ही घर चुकलां आहां !

**झुंजारराव**—छे छे ! दररोजचा मनुष्य अन् चुकेल कसा ?–बाईसाहेब ! बोलूं या त्याला पुरतें !

**तारा**—इथून तुम्ही एकदम निघून जा ! इथं तुमचं कांहीं काम नाहीं !

[ आंतून–' नसतें तर फार बरें झालें असतें. पण या घरांत माझा प्राण आहे ! मग माझें शरीर इथें घिरट्या घालित आहे, याबद्दल मजकडे काय बरें दोष ?']

**झुंजारराव**—ठीक ! ठीक ! फार उत्तम !

**तारा**—पुनः मी तुम्हाला सांगतें, तुम्ही चुकतां आहां ! पण तुमच्या कलाप्रमाणें कां होईना, उद्यां पाहिजे तर या–पण आतां चालते व्हा !

**झुंजारराव**—काय बेशरम तरी! माझ्यासमोर त्याला आमंत्रण देतेस! थांब! तुझी ही दुष्ट इच्छा पुरी करायला त्याला जीवंतच नाहीं ठेवित!

( कमरेचें पिस्तुल काढून खिडकीजवळ जातो. तारा त्याला धरते. )

**तारा**—नका नका! असा अविचार करूं नका! शपथ आहे तुह्माला!

[ आंतून—' उद्यांपर्यंत काय होईल कोण जाणे! इतका दीर्घकाळ मी कसा कंठूं? आज नाहीं का मला आंत येतां येणार.']

**तारा**—आतां मी तुह्माला शेवटचं निक्षून सांगतें! तुमच्या अंगीं थोडा तरी सभ्यपणा असेल तर इथून एकदम निघून जा! (स्वगत) देवा! काय भयंकर प्रसंग हा माझ्यावर!

[ आंतून—' बरें तर जातों मी! माझा जीव तुमच्या हातांत आहे एवढें तरी लक्ष्यांत ठेवा!' ]

**झुंजारराव**—ऐका! तुमच्या त्या गृहस्थांची अखेरची विनंति लक्ष्यांत ठेवा!

**तारा**—( स्वगत ) काय करावं, कांहीं सुचत नाहीं! माझ्या मनाचा अगदीं गोंधळ झाला आहे!

**झुंजारराव**—हें पहा मूर्तिमंत पातिव्रत्य अन् मूर्तिमंत सत्य! खरेंच, आपल्या या उज्वल पातिव्रत्यानें तूं सीता, मंदोदरी, दमयंतीसारख्या साध्वींनांहि खालीं माना घालायला लावलेंस, यांत शंका नाहीं! व्यर्थ व्यर्थ मी आजपर्यंत माझ्या पवित्र हृदयांत तुझ्यासारख्या अपवित्र कुलटेला पूज्यस्थान दिलें! तुझ्यासाठीं भोगलेल्या कष्टांचा आणि यातनांचा, तसेंच माझ्या प्रेमाचाहि आज तूं योग्य मोबदला दिलास! विश्वासघात करून कैसानं माझा गळा कापतांना निर्लज्जे! माझ्या निष्कलंक विशाल प्रेमाचें तुझ्या मनावर दडपण पडलें नव्हतें का? अथवा नवल कसलें! विश्वासघातक्याला कृतज्ञतेसारख्या पवित्र गुणाचा कधीं स्पर्श तरी होणें शक्य आहे? तारे! वरपांगीं मधुर प्रेम दाखवून—

**तारा**—आपल्याच तोंडचे ना हे शब्द? ( रडूं लागते. )

**झुंजारराव**—काय तो मांग ह्मणाला?. 'आज सायंकाळीं जेव्हां या महालांतून मी गेलों—' आज सायंकाळीं! अरे बेरडा! आणि इतक्या लवकर आलास फिरून!

**तारा**—(स्वगत) चंपाताई! तुझ्यामुळं मजवर केवढं संकट कोसळलं आहे, याची कल्पना तरी आहे तुला?

**झुंजारराव**—आणखी काय ? 'या घरांत माझा प्राण आहे—' बरोबरच आहे, इतकी चैन भोगायला मिळाल्यावर 'प्राण, पंचप्राण!' असल्या मोठमोठ्या उपमा द्यायला काय खर्च होतें ? प्राण! पंचप्राण!!

**तारा**—(स्वगत) वाटेल ते भयंकर प्रसंग येवोत, चंपाताईच्या रहस्याचा स्फोट मजकडून होणार नाहीं!

**झुंजारराव**—या महालांतल्या प्राणांशीं मिलाफ व्हावा ह्मणून त्याचें शरीर बाहेर घिरट्या घालित होतें! अरेरे! काय तरी दुष्ट मी! बिचाऱ्यांच्या प्रेमांत मी आज विघ्न झालों! मायावी, सोदी, बेशरम कुठली! पहा कशी रडते आहे ती! इतक्या सुंदर शरीरांत इतकें घाणेरडें अंतःकरण असेल अशी कोणाला कल्पना तरी होईल ? (तारेकडे टवकावरून पहातो.)

**तारा**—असे निष्ठुरपणानं मजकडे पाहूं नका! माझ्यावर विश्वास ठेवा. मी अगदीं निष्कलंक आहें! आपणाला माझा असा संशय येईल अशी मला कल्पनाहि नव्हती!

**झुंजारराव**—पुरे पुरे! माझा विश्वासघात केलास तेवढा पुरे! गोडगोड बोलून आणखी मला फसविण्याचें पातक तरी जोडूं नकोस! तारे! नांव सोनुबाई अन् हातीं कथलाचा वाळा, अशी कृति करतांना तुझ्या मनाला थोडी तरी लज्जा वाटायला पाहिजे होती! नांव काय ह्मणे तारा–अन् कृत्यें मात्र अगदीं काळीं कुट्ट! आतां तें उज्वल नांव तरी सोड आणि आपल्या कृष्णकृत्यांनां शोभेल असें एखादें 'अमावास्या' अथवा 'कृष्णा' असें नांव धारण कर!

**तारा**—माझं वर्तन इतकं पवित्र आहे, कीं, आपलं नांव मीं धारण केल्याबद्दल आकाशांतल्या त्या तारकांनांहि अभिमान वाटत असेल! मी आपल्याला परोपरीनं किती सांगूं? मी अगदीं निष्कलंक आहें. एका रहस्याचा स्फोट न करण्याविषयीं मी वचनानं बद्ध झाल्यें आहें. योग्य प्रसंगीं त्याचा उलगडा झाल्यावर आपल्या या घाणेरड्या आरोपांचंहि ताबडतोब निरसन होईल!

**झुंजारराव**—तारे! असल्या पोकळ सबबींनीं माझी समजूत व्हायची नाहीं! जिचे अनेक प्रियकर, ती वचनानें बद्ध झाली आहे, ही गोष्ट मी खरी कशी मानूं! स्त्रीजातीवर–त्यांतून तुझ्यासारख्या बेमान स्त्रीवर कोणीं गौप्य सोंपविलें, तर तें शाबूत राहील खरेंच! तूं मजबद्दल इतकी बेपर्वा झाली आहेस कीं, तुझ्या त्या गौप्याची मला गरज नाहीं–आणि तुझीहि नाहीं!

[ गुलाब येते. ]

**गुलाब**—( स्वगत ) चंपाताईंनीं सांगितल्याप्रमाणं पत्र तर नेऊन दिलं ! अन् आमची दक्षणाहि मिळविली ! ( उघड ) ताईसाहेब ! बाबासाहेब नुकतेच आले बाहेरून. ही गडबड काय आहे, हें पहायला त्यांनीं मला पाठविलं आहे. रावसाहेब ! यापेक्षां हळू बोललां तर नाहीं का चालायचं ?

[ जाते.

**झुंजारराव**—समजलों बरें तुमची युक्ति ! मीं इथून जावें हीच ना तुमची इच्छा? बरें तर, इथें राहून तुह्माला आणखी त्रास देत नाहीं. ( जाऊं लागतो. तारा त्याला धरून ठेवते. )

**तारा**—काय जाणार इतक्यांत् ?

**झुंजारराव**—आतां या घरांत मी एक पळभरहि राहणं अशक्य आहे !

**तारा**—भलताच संशय घेऊं नका. मी या घोटाळ्याचा लवकरच सर्व उलगडा करीन.

**झुंजारराव**—छद् ! आतां सांग, नाहीं तर त्याची मला गरज नाहीं !

**तारा**—आतां सांगणं अशक्य आहे !

**झुंजारराव**—तर मग तें कधींच शक्य नाहीं ! बेमान कृतघ्न स्त्रिये ! हा पहा मी गेलों !

[ तारेचा हात हिसडून वेगानें निघून जातो !

**तारा**—किती भयंकर परीक्षा ही माझ्या प्रेमाची ! मध्यंतरीं मनाची चलबिचल होऊन माझ्या हातून वचनभंग होण्याच्या अगदीं बेतांत आला होता-पण निभावलं ! याहिपेक्षां भयंकर प्रसंग आला तरी आतां मजकडून तें गौप्य फुटणार नाहीं ! माझं पवित्र प्रेमच माझ्या प्रियकराच्या मनांतलं किल्मीष घालवील, असा मला पक्का विश्वास आहे !

[ पडदा पडतो. ]

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

[ **स्थल**—हैबतरावाच्या वाड्यांतील एक खोली. हैबतराव प्रवेश करितो. ]

**हैबतराव**—हैबतराव! व्यर्थ-व्यर्थ तुझें जिणें! तूं वांचलास तरी कशाला? प्रत्यक्ष पोटच्या पोरांनीं तुझी अवज्ञा करून तुझ्या तोंडाला काळोखी फांसली, अन् तूं जिवंत राहिला आहेस? तुझ्या कुलदीपक मुलांच्या वर्तनानें सर्व जगानें दिलेली 'पळपुट्या मुलांचा बाप' ही सुंदर पदवी तुझें नांव अजरामर करील, यांत शंका नाहीं! काय करावें! मन अगदीं गोंधळून गेलें आहे-कांहीं सुचत नाहीं! आतां आनंदराव आले ह्मणजे त्यांनां तोंड कसें दाखवूं अन् काय सांगूं? तें कांहीं नाहीं! कसेंहि करून त्या कारटीचा शोध लावून आनंदरावाच्या गळ्यांत तिला बांधलीच पाहिजे! काय मला भूल पडली पहा! खिडकी असलेल्या खोलींत मीं तिला कोंडून ठेविली, ही माझी घोड्याएवढी चूक झाली! त्या खिडकीच्या वाटेनेंच ती पळून गेली खास! पण इतक्या उंचावरच्या खिडकींतून ती उतरली कशी? शिडीशिवाय तर ती उतरली नाहीं! पण तिला शिडी मिळाली कशी? अरे, हें माझ्या लक्ष्यांत अझून कसें नाहीं आलें? त्या रंभ्याचेंच हें काम! चंपेला आनंदरावाला न देण्याबद्दल त्याचा आग्रह मीं चालूं दिला नाहीं, त्याच्याबद्दल माझा सूड उगवला वाटतें रंभ्यानें हा! ठीक आहे बचाजी! हा असा जातों फौजदाराकडे अन् त्याला बरोबर घेऊन तुझ्या घराचा घेतों झाडा. ती कारटी सांपडूं दे मात्र तेथें, मग दाखवितों रंभ्या तुला तमाशा! खंडोबाशपथ मी काय करीन अन् काय नाहीं त्याचा नेम नाहीं!

[ जातो.

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थल**—रस्ता. दौलतराव चंपेचें पत्र हातांत घेऊन येतो; त्याच्या मागोमाग पिऱ्या येतो, असा प्रवेश. ]

**दौलतराव**—मजा आहे झालें एक एक! या कुंजपुरांत पाय ठेवल्याला मला अझून एक दिवस देखील झाला नाहीं, तों इतक्यांत काय काय विलक्षण गोष्टी घडून आल्या पहा! कालची ती मनोहर सुंदरी, इतकी खटपट करून

देखील शेवटीं लाभत नाहीं असें दिसतें! पण दैव अनुकूळ असलें म्हणजे असें आहे! दैवानें दुसरें एक घबाड मिळवून द्यायचें संधान आणलें आहे! काल रात्रीं ताराबाईच्या घरून रिक्त हस्तांनीं परत फिरत असतां एका बुरखेवाल्या बाईनें हें पत्र माझ्या हातीं आणून दिलें. मदनाचीच दूती ती! अहाहा! किती सुंदर, मोहक अक्षर हें! अर्थात्,असें सुंदर अक्षर लिहिणारी रमणीहि अप्रतिम सुंदर असली पाहिजे! जिनें हें लिहिलें, तिचे हेतु पूर्ण होवोत! (वाचतो.) " महाराज! आपण माझ्या आज दृष्टीस पडलां तेव्हांपासून मी आपणावर अत्यंत अनुरक्त झालें आहें. "—शब्दावडंबर न माजवितां किती थोडक्यांत लिहिलें आहे पहा! हिच्या जागीं दुसरी एखादी असती, तर तिनें पत्राच्या प्रारंभींच ' मन्मासरोविहारी हंसा! ' अशा तऱ्हेचें कांहीं तरी एखाद्या मोठ्या कवीलाहि लाजविणारें दीड हात लांब विशेषण मला उद्देशून लिहिलें असतें! बरें, पुढें काय म्हणते ही? " उद्यां सकाळीं सूर्योदयाचे सुमारास वसंतबागेंत नदीच्या धबधब्याजवळच्या कोपऱ्यांत मला आपण भेटाल, तर फार मेहेरबानी होईल. तेथें आल्यानें आपला फायदाच होणार आहे!"— पण इतका त्रास द्यायचें काय कारण, मी म्हणतों? वसंतबागेंत बोलावण्यापेक्षां मला आपल्या घरींच कां नये बोलावूं तिनें? बरें, पुढें–" आपणाला तेथें भेटण्यांत माझा कांहीं उद्देश आहे. मी तेथें बुरखा घेऊन येईन. आपण माझा चेहरा पाहण्याचा यत्न करूं नये. सभ्यतेस अनुचित आपण कांहीं वर्तन करणार नाहीं, अशी आशा आहे." या सुंदरीच्या विनंतीप्रमाणें वसंतबागेंत आपणाला गेलेंच पाहिजे. आमच्यासारख्यांच्या विभूति जगाच्या कल्याणाकरतां आहेत! हो! आपल्या मदतीनें तिचा जर कांहीं उद्देश सिद्धीस जात असला तर आपल्याला तो साधून दिलाच पाहिजे! तिचा चेहरा जरी आपणाला बघतां कामा नये, तरी तिचें रहाण्याचें ठिकाण तरी अवश्य ठाऊक असायला पाहिजे! गड्या पिऱ्या!—

**पिऱ्या**—जी सरकार! (एकीकडे) शिईशिवाय कोरडं हटकतांच येईना जनू!

**दौलतराव**—मी जातों आहें तिकडे माझ्यामागून ये. ऐकलेंस का गुलामा!

**पिऱ्या**—जी सरकार! माज कान चांगल साबूत हैती आन् काय!

**दौलतराव**—अरे ते नेहमीं शाबूत नसतात म्हणून तर मला ते ओढून लांब करावे लागतात. वसंतबागेंत मला एका बाईला भेटायचें आहे, समजलास?

**पिऱ्या**— ( स्वगत ) कालपुन धनीसाब याच खटल्यामंदीं हैती वाटतं! ( उघड ) जी सरकार ! पन मान्नीं ती आवा काय करायची हाय झंगतों !

**दौलतराव**—मध्यें तोंड घालूं नकोस गाढवा—

**पिऱ्या**—बरं हाय, न्हायलं, गाढवाच धनीसाब-कुंभार ! (दौलतराव रागानें पहातो. ) वसंतबागेंत मी काय करूं जी ? तिच्याबरोबर आलेल्या कुनाला ठोसबिस दाऊन तिला घेऊन शान् सूं करायचें हाय का काय धनीसाब ? असल्या कामांत मातर ह्या गडी पह्यया हाय बगा! कंदींबी न्हाई येनार माग !

**दौलतराव**—हा गड्या ! अडाणी खरा ! तिथें गेल्यावर काय करायचें तें सांगतों, नीट लक्ष्यांत ठेव. तिथें गेल्यावर आमच्यापासून दूर उभा राहून तिच्याकडे नीट लक्ष्य देऊन ऐस, अन् बागेंतून ती निघाल्यावर तिला नकळत तिच्या मागून जाऊन ती कुठें जाते तें नीट पाहून मला येऊन सांग. जर का यांत चुकलास, तर संभाळून रहा, हड्डी नरम करीन !

**पिऱ्या**—ह्ये काम अस करतों धनीसाब, कीं खूस होऊनशान आपण माझ्या हातामंदीं कडीच ठोकावी !

**दौलतराव**—बरें आहे, नाहीं तर घोड्याच्या चाबकाशीं गांठ आहे ! चल तर झालाच वेळ ! ( स्वगत ) असा प्रभातींचा आनंदकारक वेळ आणि वसंतबागेसारखें सुंदर स्थळ असल्या कामाला शोधून काढणारी स्त्री खरोखर चतुर असली पाहिजे ! [ जातात.

---

## प्रवेश ३ रा.

[ **स्थळ**–रंभाजीरावाचें घर. मंजुळा आणि हिरोजी बोलत उभीं आहेत, असा प्रवेश. ]

**हिरोजी**—काय ह्मणतेस ! तुझी धनीण घरांतून कुठें नाहींशी झाली अन् प्रत्यक्ष तुला देखील तिचा पत्ता नाहीं ! अशा थापांनीं मी फसेन वाटतें ?

**मंजुळा**—खरंच नाहीं हिरोजीराव ! अन् मला कळणार तरी कसं ? माझ्यावर आपलं बाईसाहेबांचं प्रेम यथातथाच होतं. असल्या कांहीं गुप्त गोष्टी त्या मला कधींच सांगत नसत ! त्या थेरड्याशीं लग्न चुकवायला कुठं तरी घरांतून जावं, असं मींच त्यांना काल सुचविलं; पण मला त्याबद्दल त्या रागं भरल्या अन् रात्रीं मला न कळवितां कुठं नाहींशा झाल्या ! पण हिरोजीराव ! आज तुमची चर्या फार गंभीरशी दिसते ?

**हिरोजी**—(आंगठीकडे पहात) हो, तसें व्हायला आज थोडेंसें कारण झालें आहे! त्यामुळें माझ्या मनांत कांहीं निराळेच विचार घोळूं लागले आहेत. हा हलका नोकरीचा पेशा टाकून थोडेंसें वरच्या पायरीवर जातां आलें तर पहावें, असें मला वाटूं लागलें आहे. प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यांत अशी एखादी घटका येते कीं, तिचा जर तो योग्य उपयोग करील, तर तो मोठा भाग्यशाली होतो.

**मंजुळा**—(स्वगत) काय? हिऱ्याची आंगठी? तरीच असले हे विचार स्वारीच्या डोक्यांत येऊं लागले! पण या कफल्लक अवधूत महाराजांनां कुठं बरं ही मिळाली? कुठं हातबीत तर नाहीं ना मारला रावांनीं? (उघड) हिरोजीराव! ती आंगठी मोठी सुंदर दिसले आहे—

**हिरोजी**—ही आंगठी मोठी सुंदर आहे, हें सांगायला तूं नकोस कांहीं! ओळख बरें कुणीं मला ही दिली तें! जिनें मला ही दिली, ती स्वरूपानें अगदीं इंद्राची रंभा आहे—जसा कांहीं शुक्राचा तारा!

**मंजुळा**—हिरोजीराव! थट्टा करतां वाटतं माझी? तुमच्या या काजळी स्वरूपावर भाळून का त्या रंभेनं तुह्माला ही आंगठी दिली? अहाहा! दिवे ओवाळा या स्वरूपावरनं! कुणीं दिली ही तुह्माला!

**हिरोजी**—मला वाटेल तेव्हां मी सांगेन! तूं या सरदारबाजीला विचारणार कोण?

**मंजुळा**—अगबाई! कोण–सरदार! अहाहारे सरदार! झुंजाररावांच्या चाबकांचे फटके खाऊनच का ही सरदारी मिळाली? डोकं आहे ना नीट ठिकाणावर? गांजाबिंजाच्या तारेंत नाहीं ना बडबडत हें? ती कुणीकां देईना—तेवढी ती मला द्या ह्मणजे झालं! असले हे नाजुक दागिने तुह्मां पुरुषांपेक्षां आह्मां बायकांच्या अंगावर चांगले शोभतात हो!

**हिरोजी**—(स्वगत) असें काय? त्या गुलाबसारखी तुझीहि या आंगठीवर नजर आहे वाटतें! तुह्मी दोघीहि अट्टल चोर आहां! तुह्मी मला फसवायला बघतां आहां, पण गोड गोड थापा देऊन तुमच्या दोघींच्याहि तोंडाला मीं पानें पुसलीं नाहींत–तर नांवाचा हिरोजीच नव्हें! (उघड) तुला ही आंगठी मीं मोठ्या आनंदानें दिली असती; पण जिनें मला ही दिली तिनें जर मला पुनः हिच्याबद्दल विचारलें, तर काय सांगूं तिला? खोटें तर बोलायचें नाहीं हा माझा बाणा आहे!

**मंजुळा**—अहाहारे धर्मराज ! खोटं बोलल्यावांचून एक क्षण सुना जाईना अन् मोठ्या खरेपणाच्या गप्पा कशाला मारतां आहां ? कांहीं तरी निमित्त सांगून आंगठी मला द्यायची नाहीं आहे तुमच्या मनांतून ! माझ्यावर तुमचं प्रेमच नाहीं—

**हिरोजी**—छे छे छे छे ! तसें नव्हे—

**मंजुळा**—प्रेमाच्या मोठ्या बाता मारित होतां तें हेंच का तुमचं प्रेम ? फक्त कुठं एक आंगठी मागलें आहें ती तुमच्यानं देववेना ! तुह्मी पुरुष ह्मणजे असेच गळेकापू–निष्ठुर–बेमान–चोर ! दुसऱ्याचं जरी दुःखानं हृदय फुटलं, हिरोजीराव !—( रडूं लागते )

**हिरोजी**—( स्वगत ) हीं सारीं सोंगें समजताहेत मला ! ( उघड ) मंजुळे ! रडूं नकोस अशी ! तुला रडतांना पाहिलें ह्मणजे मला कसें भडभडून येतें ! तुझ्याशिवाय माझें दुसऱ्या कुणावर प्रेम असणार बरें ?

**मंजुळा**—त्या सटवे गुलाबडेवर ! तिनंच वाटतं ही आपल्या धनिणीची आंगठी चोरून तुह्माला दिली ? ती जर माझ्या आतां दृष्टीस पडती तर या–ह्या हातानं तिच्या झिंझ्या ओढून ह्या हाताच्या नखांनीं अवदसेचे डोळेच फोडून टाकले असते !

**हिरोजी**—नाहीं–नाहीं–नाहीं–तिनें नाहीं ही दिली ! मीं आपली ही तुझी थोडीशी थट्टा केली ! ही आंगठी मुळीं माझी नव्हे–ही धनीसाहेबांची. हिचा खडा सैल झाला आहे, तो नीट बसवून आणायसाठीं त्यांनीं ही माझेजवळ दिली आहे ! पूस आतां ते डोळे अन् दे एक साखरे—

[ इतक्यांत गुलाब येऊन आड उभी रहाते. ]

**मंजुळा**—पण तुह्मी सांगतां तें खरं आहे ना ? की आपली थाप आहे मला फसवायसाठीं ?

**हिरोजी**—कां बरें तुला खोटें वाटतें हें ?

**गुलाब**—(स्वगत) अस्सं अस्सं ! एकून या दोघांचं मेतकूट जमलेलं आहे तर ! अन् मला उगीच मोठमोठ्या थापा मारित होती स्वारी ! पण हें खरं खोटं काय चाललं आहे तें हळूच इथं लपून राहून ऐकलं पाहिजे !

**मंजुळा**—तर मग त्या गुलाबची अन् तुमची इथं आल्यापासून भेट झाली नाहीं ?

**गुलाब**—( स्वगत ) कां! माझं नांव कशाला घेतलं सटवीनं ?

**हिरोजी**—खरंच नाहीं! या मुक्या शपथ नाहीं!

**गुलाब**—( स्वगत ) अरे चोरा!

**मंजुळा**—तर मग खरंच नाहीं त्या सटवीवर तुमचं प्रेम ?

**हिरोजी**—त्या हडळीवर अन् माझें प्रेम! मंजुळे! तुला वेड तर नाहींना लागलें ? अहाहा! काय त्या डाकिणीचें रूप! जणूं शूर्पणखा! अंगानं तर दहा ठिकाणीं वांकडी! अशा कुब्जेवर माझें प्रेम बसेल तरी कसें ? तिच्यांत का रूप आहे, का गुण आहेत ? वर्णानें तर काळ्याकुट्ट ह्मैशीशीं स्पर्धा करते आहे. स्थूलपणांतहि तोच मासला! मीं तुला किती वेळ बरें सांगितलें, कीं, ती त्राटिका माझ्या दृष्टीससुद्धां नको ह्मणून! तूं असें नको समजूंस, कीं, तिच्या मागें तुला खूष करण्यासाठीं मी असें बोलतों ह्मणून! तिच्या तोंडावरसुद्धां हें सांगायला मी कमी करणार नाहीं!

**गुलाब**—( एकदम पुढें होऊन हिरोजीच्या गालांवर चापट मारून ) हं, ही मी आल्यें तुझ्यासमोर! काय मला सांगतोस तें सांग बघूं चोरा!

**हिरोजी**—( स्वगत ) अरे बाप रे! ही हडळ कुठून इथें आली ? आतां मात्र आमची पुरी फजिती!

**गुलाब**—मी त्राटिका, शूर्पणखा, अन् हडळ नाहीं का ? दहा ठिकांणीं वांकडी—

**हिरोजी**—त–त–स–स—

**गुलाब**—अन् अंगानं, वर्णानं काळीकुट्ट ह्मैस! माझ्यांत गुणबिण कांहीं नाहींत, नाहींरे चोरा! ( आणखी चापटी मारते. )

**हिरोजी**—गु–गु–गुलाब! म–म–मी क–क–कांहीं तें तुला उद्देशून नाहीं ह्मटलें ? तुझें नांव तरी घेतलें मीं ?

**गुलाब**—त–त–त अन् प–प–प–गप बंस चहाटळा! मी कांहीं बोळ्यानं दूध नाहीं पीत!

**मंजुळा**—कां, तोंडसं फार सोडलं आहेस ? बोलूनचालून तूं जर तशी आहेस—

**गुलाब**—पुरेपुरे अवदसाबाई! आपण नको कांहीं मधें तोंड घालायला!

**मंजुळा**—कुणाला ग ह्मणतेस अवदसा! नीट तोंड संभाळून बोल! आह्मी दोघं इथं असतां तूं अगोदर आलीस कशाला इथं ? तुझ्या तोंडावर

यांनीं तुह्मी इतकी फजीती केली तरी तुला लाज नाहीं ! यांच्यावर तुझा कांहीं हक्क नाहीं. हो चालती इथून—

**हिरोजी**—( स्वगत ) काय सटव्या आहेत पहा ! या दोघीजणी माझेवर आपापले हक्क स्थापित करताहेत ! जणूं काय मी एखादें शेतबीत आहें !

**गुलाब**—इथून जा ह्मणून मला सांगणारी तूं कोण ? मेलं बटकूर तें बटकूर अन् आव आणते आहे एखाद्या सरदाराच्या लेंकीचा ?

**मंजुळा**—अन् तूं मोठी राजाची राणी लागली आहेस जणूं! यांचा तुझा कांहीं संबंध नाहीं–मग काळं कां करित नाहींस अझून ?

**गुलाब**—तूंच घे आपला हक्क गाजवून यांच्यावर ! असल्या या खापर-तोंड्यावर खूष व्हायला तुझ्यासारखी मी आंधळी नाहीं ! हक्क गाजवायच्या अगोदर लग्न तरी करून घे हो ! नाहीं तर—

**मंजुळा**—कुणाचीग करत्येस मेले असली घाणेरडी थट्टा ! तूं असशील मोठी राजाची राणी, पण मला नाहीं असली थट्टा खपायची !

**हिरोजी**—( स्वगत ) वहावा ! मी पुराणांतला कृष्णच झालों ह्मणायचा या भांडणाऱ्या अवदसांमुळें ! ( उघड ) ही गुलाब तर पूर्वीच राधा ठरून गेली आहे ! अन् तूं कोण ग ? सत्यभामा का रुक्मिणी ? माझ्या हक्कासाठीं तुह्मी दोघीहि भांडूं नका ! आपसांत समेट करून हक्काचें हें प्रकरण तुह्मी माझ्याकडे सोंपवा! ह्मणजे दोघांनांहि समाधान होईल अशा रीतीनें मी तुमच्या या तंट्याचा निकाल करीन.

**गुलाब**—नाहीं हो फाकडराव ! तुह्मी समजतां इतकी काहीं मी भोळी नाहीं ! अन् मघांशीं तुह्मीं केलेलं माझं वर्णन इतक्यांत विसरून जाण्यासारखी मी विसराळूहि पण नाहीं !

**मंजुळा**—माझंहि समाधान अशानं व्हायचं नाहीं ! आह्मा दोघींत तुह्माला कांहींच का भेद दिसत नाहीं ?

**हिरोजी**—( स्वगत ) नाहीं कसा ? एक हडळ अन् एक जखीण !

**गुलाब**—अहो तुह्मी घुबड महाराज ! तुमच्या या ओंगळ हिडिस रूपावर मी भाळून गेल्यें आहें ह्मणून हवं तसं माझ्याशीं वागलं तरी चालेल असं तुह्मांला वाटतं कीं काय ? तसं वाटत असलं तर तुमची ती चूक आहे! तुमचा विश्वासघातकी, हलकट स्वभाव चांगला समजून घेण्याकरतां मीं तें सारं सोंग केलं होतं ! अन् त्याला तुह्मी फसलांत ! ही फेंगड्या पायांची मंजुळा मला मुळींच

दृष्टीसमोर नको, तिच्यावर माझं तिळमात्र प्रेम नाहीं, तिला मी फसवितों आहें, असं किती वेळ तुह्मीं मला आणाशपथा घेऊन सांगितलंत, त्याची कांहीं आठवण आहे का ?

**मंजुळा**—असं काय ? फेंगड्या पायांची कुब्जा मी का ? अन् आतां माझ्या तोंडावर तूं हें—( गुलाबच्या अंगावर धावून जाते. )

**हिरोजी**—(तिला अडवून) तिचें काय ऐकतेस तूं ! ती अगदीं खोटें बोलते ! अशी बेफाम होऊं नकोस; जरा राग आवरून—

**मंजुळा**—( त्याला ढकलून ) पुरे करा चहाटळपणा ! मी फेंगड्या पायांची कुब्जा ! मी दृष्टीसमुद्धां नको– नाहीं का ? दम धरा ! झुंजाररावांना सांगून तुमचं पेंकट मोडवून तुह्माला मीच फेंगडे करविलें ! मला तुह्मी फसविणार होय? झुंजारराव—

**हिरोजी**—कोण ? धनीसाहेब आले कीं काय ? अरे बापरे !

**गुलाब**—( स्वगत ) बस हीच मौज आपणाला ! तंटा तर लावून दिला दोघांत !

**हिरोजी**—( मंजुळेला एकीकडे ) काय खुळी आहेस तूं ! एवढें समजूं नये तुला ? रागानें हवें तें बडबडत सुटणाऱ्या बायकोचें बोलणें खरें मानतेस तूं ? अग वेडे ! तुझ्यांत आणि माझ्यांत कलागत लावून फूट पाडावी हा तिचा हेतु तुला कसा कळत नाहीं ? ( गुलाबजवळ जाऊन हळूच ) खुळे पोरी ! थट्टासुद्धां समजत नाहीं ना तुला ? एवढ्याशा थट्टेबद्दल तूं इतका थयथयाट करावास हें तुला शोभतें का ? तूं आलीस ती मीं पाहिली नाहीं असें का समजतेस तूं ? वेडी कुठली ! अग, मीं तुला येतांना पाहिलें, ह्मणून तुझी थोडीशी थट्टा करून, तुला राग आणून, नंतर तुझी विनवणी करून तुला प्रसन्न करून घ्यावें एवढ्या-साठीं मीं हें सारें केलें-पण तूं काय ? तुला थट्टाबिट्टा कांहीं समजतच नाहीं ! बसलीस चटकन् फुण्ण होऊन ! राग कसा अगदीं नाकावर ! बरें, आतां राग सोडून प्रेमानें दे पाहूं एक साखरेचा—

**गुलाब**—तुमचे साखरेचे अन् गुळाचे घाला नेऊन चुलींत ! एक शब्द दिखील बोलूं नका माझ्याशीं !

[ आंतून ' हिरोजी ! हिरोजी ! ' अशी हांक ऐकूं येते. ]

**हिरोजी**—*अरे बापरे ! धनीसाहेबच हे ! मरोत या शिंच्या दोघीहि कैकया !* त्यांच्या या दृष्टीस पडून उपयोगी नाहींत ! आतां करूं तरी काय ?

**मंजुळा**—हा झुंजाररावांचाच शब्द खास! मी हिरोजीरावांबरोबर इथं त्यांच्या दृष्टीस पडतां कामा नये! आतां इथून जावं कसं?

[ आंतून 'हिरोजी! ए गध्या हिरोजी!' अशी पुनः हांक ऐकूं येते. ]

**हिरोजी**—हा आलों सरकार! ( गुलाब व मंजुळेकडे पहात. ) पटकी येवो तुह्मा दोघांवर!

**गुलाब**—काय करूं मी आतां? जाऊं तरी कशी इथून? झुंजाररावांच्या मला दृष्टीस पडतां कामा नये!

**हिरोजी**—जाणार कुठें? आतां मी सांगतों तसें तरी करा. आपसांतली धुसफुस थोडा वेळ बाजूला ठेवून दोघीहि या कपाटांत जाऊन बसा पाहूं झटकन्! असें नसलें करायचें तुह्माला तर इथें अशा उभ्या राहून पुढें काय तमाशा होईल तो पहा! याशिवाय दुसरा कांहीं इलाज नाहीं!

**गुलाब**—कुठं पाहिजे तिथं लपायला मी तयार आहें, पण त्यांच्या दृष्टीस पडायला नको! लपवा मला कपाटांत! ( हिरोजी कपाट उघडतो; गुलाब आंत लपते.)

**मंजुळा**—काय होईल तें होवो! प्राण गेला तरी बेहेत्तर! पण त्या सटवी-जवळ एक क्षणभरदिखील रहायला मी कबूल होणार नाहीं! तरी पण त्यांच्या दृष्टीस पडून उपयोगी नाहीं. इथंच पलीकडे कुठंसा एक जिना आहे, असं मला आठवतं. तो पहावें कुठं सांपडला तर!

[ जाते.

[ झुंजारराव आणि रंभाजीराव येतात. ]

**झुंजारराव**—कायरे गध्या! तूं निजला होतास वाटतें? माझ्या हांका ऐकूं नाहीं आल्या तुला?

**हिरोजी**—ऐकल्या सरकार! आपल्याला मीं हांकहि दिली. इतक्यांत मी येतच होतों सरकार!

**झुंजारराव**—जा, निघायची तयारी कर. आत्तांच्या आत्तां या कुंजपुरास रामराम ठोकायचा! पुनः कधीं याचें तोंडहि पहायचें नाहीं!

**हिरोजी**—( स्वगत) आरीच्या! असें झालें तरी काय? आपल्याला काय—आपण हुकुमाचे चाकर!

[ जातो.

**रंभाजीराव**—झुंजारराव! तुला असें खवळायला कारण तरी काय झालें?

**झुंजारराव**—एक बेमान स्त्री! रंभाजीराव! स्त्रिया अनृत, साहस, माया इत्यादि दुर्गुणांच्या केवळ खाणीच आहेत असें जें कुणीं शास्त्रकारानें ह्मटलें

आहे, तें अक्षरशः खरें आहे! स्त्री आणि बेमानपणा यांचें जन्मापासून साहचर्य! अरेरे! काय करूं?

**रंभाजीराव**—झुंजारराव! जरा शांत हो. एखादा साधारण अशिक्षित मनुष्य जर असें कांहीं बडबडता तर तें योग्य होतें. कारण, हलक्या नीच लोकांशीं संभाषणानें–त्यांच्याशीं मिसळण्यानें स्त्रीजातीविषयीं असल्या भलत्या कुशंका उत्पन्न होतात. पण तुझ्यासारखे उच्च दर्जाचे, चांगलें शिक्षण मिळालेले लोक उगीच अविचारानें कोणाची निंदा करित नाहींत. मी खात्रीनें सांगतों, कांहीं तरी खोट्या शंकेमुळें तुझें चित्त क्षुब्ध झालें आहे. प्रेमाला शंकास्थानें पुष्कळ असतात.

**झुंजारराव**—नाहीं रे रंभाजीराव! 'चक्षुर्वै सत्यं' या न्यायानें प्रत्यक्ष या डोळ्यांनीं पाहिलेल्या आणि या कानांनीं ऐकलेल्या गोष्टीबद्दल खोटी शंका कसली? मित्रा! सर्वस्वी घात झाला! तारेनें माझ्याशीं बेमान होऊन माझ्या तोंडाला काळोखी आणली! या कुंजपुरास पुनः येण्याची मीं इच्छा करावी, असें तुझ्याशिवाय इथें माझ्या प्रेमाचें माणुस कोणी राहिलें नाहीं! ज्यानें माझा असा सर्वस्वी घात केला, त्या माझ्या प्रतिस्पर्ध्याचा आणि त्या जारिणीचा सूड घ्यायची प्रबल इच्छा ही मात्र मला पुनः कुंजपुरास खचित आणील. तो राक्षस कोण हें मला कळलें नाहीं! जर तो नराधम माझ्या दृष्टीस पडला असता तर या समशेरीनें त्याचें वक्षस्थल फोडून तारेच्या बेमानपणाचा पक्का सूड घेतला असता! काय करूं? अंगाचा कसा भडका होतो!

[ हिरोजी येतो. ]

**हिरोजी**—सरकार, सरकार, आपले बाबासाहेब इकडे येताहेत.

**झुंजारराव**—मी इथें आहें हें त्यांनां समजलें आहे काय?

**हिरोजी**—तें मला नाहीं ठाऊक सरकार! त्यांनीं रंभाजीरावांची चौकशी केलेली मात्र मीं ऐकली.

**रंभाजीराव**—त्यांनीं तुला पाहिलें काय?

**हिरोजी**—नाहीं. त्यांचा शब्द ऐकतांच धनीसाहेबांनां वर्दी द्यायला मी धावत आलों.

**झुंजारराव**—तर मग तूं त्यांच्या दृष्टीस पडूं नकोस. ( हिरोजी जातो. ) रंभाजीराव, मी आतां या खोलींत जातों. कारण, त्यांच्या परवानगीवांचून मी इथें आलों, याबद्दल बाबा मजवर खास अतोनात संतापतील.

**रंभाजीराव**—जा तर झटकन्! हे ते आले पहा!

[ झुंजारराव जातो.

[ हैबतराव येतो. ]

**हैबतराव**—फौजदारसाहेब! तुह्मी बाहेरच असा. मी बोलावीन तेव्हां ताबडतोब आंत या. रंभाजीराव! मी इथें ज्या कामासाठीं आलों आहें तें फार गुप्त आहे. ह्मणून इथें जवळपास कोणी असेल तर त्याला इथून जायला सांग.

**रंभाजीराव**—इथें कोणी नाहीं, दादासाहेब! काय बोलायचें तें खुशाल मोकळेपणीं बोला.

**हैबतराव**—रंभाजीराव! फार चांगलें केलेंस! मीं तुझा असा कोणता अपराध केला होता, कीं, त्याच्यासाठीं तूं माझ्या तोंडाला अशी काळोखी फांसावीस?

**रंभाजीराव**—आपण काय ह्मणतां तें मला कांहीं कळत नाहीं दादासाहेब!

**हैबतराव**—आज माझा झुंजार इथें असता तर आमच्या कुळाला तूं लावलेल्या या कलंकाबद्दल त्यानें तुझा चांगला सूड घेतला असता!

**रंभाजीराव**—दादासाहेब! काय तें नीट स्पष्ट सांगा. माझ्या साऱ्या जन्मांत कधीं मीं कुणाला कलंक लागण्यासारखें कृत्य केलें नाहीं; मग आपणासंबंधीं तर नाहींच नाहीं!

**हैबतराव**—साफ खोटें सांगतोस तूं! माझ्या पोरीला तूं फुसलावून पळवून नेलीस.

**रंभाजीराव**—काय घाणेरडा आरोप हा! दादासाहेब! आपला आरोप अगदीं खोटा आहे!

**हैबतराव**—तूं कांहीं जरी सांगितलेंस, तरी तूंच हें कृत्य केलेंस अशी माझी पक्की खात्री आहे! बऱ्या बोलानें तिला माझ्या हवालीं लवकर कर, नाहीं तर खंडोबाशपथ, पुढें काय होईल तें मी सांगत नाहीं!

**रंभाजीराव**—स्वाधीन करूं? पण अगोदर ती आहे कुठें?

**हैबतराव**—ती कारटी तुझ्या घरांतच आहे, याबद्दल माझेपाशीं पुरावा आहे.

**रंभाजीराव**—दादासाहेब! तुह्माला हें कुणीं खास खोटें सांगितलें! मी परमेश्वराला स्मरून सांगतों कीं, झुंजारराव इथून गेल्यापासून चंपाताईला मीं एकदासुद्धां पाहिलें नाहीं!

**हैबतराव**—हें जर खरें, तर मग तुला मी एकच प्रश्न विचारतों. आनंदरावांची इतकी निंदा करून चंपेचें त्यांच्याशीं लग्न लावूं नये, अशी जी मोठ्या कळवळ्यानें तूं काल तिच्याबद्दल तरफदारी केलीस, ती काय म्हणून ?

**रंभाजीराव**—आनंदरावासारख्या मूर्ख, व्यसनी, थेरड्याशीं चंपाताईचा विवाह झाल्यानें तिच्या साऱ्या जन्माची माती होईल असें मला वाटलें म्हणून, आणि माझ्या जिवलग मित्राच्या बहिणीच्या कल्याणाविषयीं प्रयत्न करणें आपलें कर्तव्य आहे असें समजून मीं काल आपल्याजवळ तशी विनंति केली.

**हैबतराव**—आणि म्हणूनच वाटतें तिच्या बापाच्या तोंडाला तिच्याच हातानें काळोखी फांसण्यासाठीं तिला खिडकींतून खालीं घेतलीस ?

**रंभाजीराव**—मी आपल्याला शपथपूर्वक सांगतों आहें कीं, मीं हें कृत्य केलें नाहीं ! इतकेंच नव्हे, तर मीं तिला पाहिलेंहि नाहीं! तिच्यासंबंधानें मला यत्किंचितहि माहिती नाहीं. असें असतां, दादासाहेब ! आपण कां बरें असें बोलतां? आपण म्हणतां त्याप्रमाणें जर ती गेली असेल, तर ती युक्तिहि तिचीच असली पाहिजे. त्याबद्दल मला कां दोष देतां ?

**हैबतराव**—बरें बरें ! फार पंचाईत हवी कशाला उगीच ? तूं कांहीं सांगितलेंस तरी माझी कांहीं खात्री होणार नाहीं. मी तुझ्या घराचा झाडा घेणार ! फौजदारसाहेब ! आंत या.

**गुलाब**—( कपाटाचें दार हळूच उघडून ) काय फौजदार ! अन् इथं झाडा घेणार ? अगबाई ! आतां मी काय करूं ?

**रंभाजीराव**—फौजदार? दादासाहेब! तुम्हाला याचा फार पश्चात्ताप होईल!

[ फौजदार आणि दोन शिपाई येतात. ]

**हैबतराव**—माझ्या पश्चात्तापाची तुला काळजी नको—पश्चाताप व्हायचा तुलाच ! फौजदारसाहेब ! आपण अन्यायाचे शत्रु आहां. माझी मुलगी शोधण्याच्या कामांत मला मनापासून मदत करा. आपले श्रम फुकट जायचे नाहींत. या घराचा कोणताहि भाग शोधल्याशिवाय राहूं नका. चला, या माझ्या मागून.

[ झुंजारराव असलेल्या खोलीशीं जातो. रंभाजीराव तरवार उपसून दाराजवळ उभा राहतो. ]

**रंभाजीराव**—माझ्या घराची झडती घ्यायला तुम्हाला अधिकार काय, हें मला प्रथम समजलें पाहिजे. त्याशिवाय मी तुम्हाला आंत जाऊं देणार नाहीं !

**फौजदार**—काय ? सरकारच्या अंमलदारावर तरवार उपसण्याचें धाडस करतां? रंभाजीराव! तुह्मी काय समजतां ? मी सरकारचा फौजदार आहें. माझा अधिकार इथें किती आहे, हें नीट ध्यानांत आणा अन् आपली तरवार बाहेर काढा. माझ्या अधिकाराच्या जोरावर मी तुह्माला सांगतों—नव्हे हुकूम करतों—कीं, पहिल्यानें तरवारीला म्यान करा! नाहीं तर इथल्या इथें मी तुह्माला जमीनदोस्त करीन! तुमच्या एका तरवारीला आमच्या तीन तरवारी आहेत, आणि त्याशिवाय आमच्याकडे अधिकाराचा जोर आहे, हें खूब समजून ठेवा!

**हैबतराव**—फौजदारसाहेब! पहातां काय ? हा बेरड तरवार उपसून जेव्हां त्या दाराजवळ उभा राहिला आहे, तेव्हां ती कारटी खास खास याच खोलींत असली पाहिजे! तुमच्या अधिकारासंबंधीं हा कमजास्त प्रश्न करील, तर टाका करून तेथल्या तेथेंच त्याला गारद!

**रंभाजीराव**—तुह्मी शोधित आहां ती स्त्री इथें नाहीं, हें मी तुह्माला पुनः सांगतों! पण या खोलींत अशी एक वस्तु आहे, कीं, मी प्राण देईन, पण ती वस्तु तुमच्या नजरेस पडूं देणार नाहीं!

**हैबतराव**—बघतां काय? फोडा दरवाजा अन् शिरा आंत! माझ्या मुलीशिवाय आंत कोणी नाहीं! घ्या हिसकावून त्याची ती तरवार!

[ झुंजारराव बाहेर येतो व रंभाजीरावास मिळतो. ]

**झुंजारराव**—व्हा बाजूला चोरांनों! काय अंदाधुंदी ही! घरच्या मालकाचा खून त्याच्याच घरांत दिवसाढवळ्या करतां ?

**हैबतराव**—अरे बापरे! कोण हा? हा तर माझा मुलगा झुंजार!

**फौजदार**—काय झुंजारराव? दैवानेंच आज मला इथें आणलें ह्मणायचें! मुरारराव मेला तर पांचशें मोहरा आल्याच माझ्या हातांत! पकडारे याला! पांचशें मोहरांचें बक्षीस लागलें आहे तें यालाच पकडण्याबद्दल!

**हैबतराव**—दुर्दैवा! आतां मात्र मात केलीस! माझ्याच हातानें मीं पोटच्या पोरावर असा प्रसंग आणला ना? बाळा झुंजारा! मीं तुला पत्र देखील पाठवूं नकोस ह्मणून बजावलें होतें, पण त्याकडे लक्ष्य न देतां वाघाच्या गुहेंत आपण होऊन कशाला बरें आलास? अरेरे! असे हे एकएक प्रसंग पहायला मी करंटा जीवंत तरी कशाला राहिलों!

**रंभाजीराव**—मी नव्हतों दादासाहेब सांगत, कीं, यापासून आपणाला पश्चात्ताप होईल म्हणून? कोण आहेत रे तिकडे ? या सारे एकदम !

[ चाकर धावून येतात. ]

**रंभाजीराव**—उपसा आपल्या तरवारी ! झुंजाररावाशिवाय कुणालाहि आंतून बाहेर, किंवा बाहेरून आंत येऊं देऊं नका !

**झुंजारराव**—दिलदार रंभाजीराव !

**रंभाजीराव**—फौजदार ! जर केवळ पैशाच्याच लोभानें माझ्या मित्राला पकडायला पाहशील तर तुला न्यायदेवतेचा दंडधारक न मानतां दरवडेखोर चोर समजून तुझ्यावर आह्मी बेगुमान तरवार चालवूं !

**फौजदार**—बरें आहे, पाहूं तर आतां पांचशें मोहरांचा तमाशा ! ( तरवार उपसतो. )

**हैबतराव**—फौजदारसाहेब ! थांबा ! थांबा ! थांबा ! त्या चकचकणाऱ्या टिकल्यांसाठीं रक्तपात करण्याचें काय कारण आहे ? मुरारराव मेला तर तुमच्या पांचशें मोहरा मजकडे लागल्या; झालें ? शिवाय, तुह्माला आणि तुमच्या या इमानी नोकरांनां पानसुपारीसाठीं पंचवीस मोहरा आतांच्या आत्तां देतों !

**फौजदार**—( स्वगत ) यांच्या ह्मणण्यांत आमचा जास्त फायदा आहे. मुरारराव मेला तर या ह्माताऱ्याकडून पांचशें मोहरा मिळतील, अशी आतांच याच्याकडून कांहीं तरी हमी घेतली ह्मणजे झालें. ( उघड ) ठीक आहे. मी कांहीं तुमच्या बाहेर नाहीं. झुंजाररावांशीं कांहीं माझें वैर नाहीं. मला मोहरा मिळाल्याशीं कारण ! पण यांत माझ्यावर थोडीबहुत तोहमत येण्याचा संभव आहे—चला जरा याबद्दल एकीकडे जाऊन विचार करूं.

[ दोघे जातात.

**झुंजारराव**—अरे चोरांनों !

**रंभाजीराव**—झुंजारराव ! माझ्या घरांत असा घोटाळा होऊन तुह्मा पितापुत्रांनां फार त्रास झाला, याबद्दल मला फार वाईट वाटतें. तुझ्या बापाची मात्र मला फार कींव येते. एकीकडे एकुलता मुलगा आणि एकीकडे त्याला प्राणांपलीकडेहि असलेल्या मोहरा, यांतून एक कांहीं तरी गमावणें बिचाऱ्याला भाग आलें आहे. तरी पण मला वाटतें, अखेरीस पुत्रप्रेमाचा विजय होणार !

[ फौजदार व हैबतराव येतात. ]

**हैबतराव**—आतां तरी त्याविषयीं नाहीं ना कांही संशय राहिला ? फौजदारसाहेब! मोठा मनमिळाऊ स्वभाव आहे बुवा तुमचा! बाळा झुंजारा! तुझ्या अविचारी स्वभावामुळें केवढे अनर्थ गुदरताहेत हे, पाहिलेंस ? यावेळीं आपल्या हातानें आपणा स्वतःवर आणि माझेवर केवढा भयंकर प्रसंग आणला होतास! तुझी कानउघडणी करायची हा प्रसंग नव्हे आणि मला वेळहि नाहीं. पण एवढेंच सांगायचें तुला, कीं, अविचाराच्या भरीं भरून आतां तरी आणखी अधिक संकटें आपणावर आणि माझेवर ओढून आणूं नकोस!

[ हैबतराव, फौजदार व शिपाई जातात.

**झुंजारराव**—रंभाजीराव! तुझा मी कसा उतराई होऊं ? माझ्यासाठीं आपले प्राणहि देण्यास तूं तयार झालास! धन्य आहे तुझ्या शीलाची! पण रंभाजीराव! बाबांनीं जो आरोप तुझ्यावर केला—मीं सर्व ऐकलें आंतून— त्याचें निरसन तुझ्याकडून झालेलें ऐकल्याशिवाय माझें समाधान होणार नाहीं. तुझ्यासारख्या मित्राबद्दल संशय घेणें योग्य नाहीं, तरी पण मी तुला विचारतों, माझ्या बहिणीविषयीं तुला कांहीं माहीत आहे का ?

**रंभाजीराव**—माझ्या शब्दावर तुझा भरंवसा आहेना ? प्राण गेला तरी मी सत्यापासून ढळणार नाहीं, हेंहि तुला ठाऊक आहे ना ? ईश्वराला स्मरून सांगतों, कीं, चंपाताईविषयीं मला यत्किंचितहि ठाऊक नाहीं!

**झुंजारराव**—झालें माझें समाधान! तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे!

[ दगड्या येतो. ]

**दगड्या**—सरकार, अक्शी आनंदाची बातमी आनलिया म्यां!

**रंभाजीराव**—काय रे ती ?

**दगड्या**—मुरारराव झन बरा झाला, आन् त्यो आज सारंगपुरला निगून-शान् गेलाबी! त्यो लई बिमार व्हता ही बातमी अक्शी खोटी सरकार! मुराररावाच्या वाड्यांतला त्यो येसाजी नाईक हे न्हव का,त्येनच परत्यक्ष मास्नी त्यो आतां सांगितलं धनीसाब!

**झुंजारराव**—ही बातमी खरी असेल तर काय बहार होईल! माझ्या त्या प्रतिस्पर्ध्याचा आणि चंपेचा शोध मला आतां मोकळेपणानें राजरोस करतां येईल. रंभाजीराव! या बातमीचा तूं स्वतः शोध करून येतोस का ?

**रंभाजीराव**—हा निघालों आतांच! दगड्या! मी बाहेर जाऊन येतों, तोंपर्यंत झुंजाररावांकडे कुणालाहि येऊं देऊं नकोस, समजलास ?

**दगड्या**—जी सरकार !

[ रंभाजीराव व दगड्या जातात. ]

**गुलाब**—( कपाटाचें दार हळूच उघडून ) सुटल्यें बाई एकदाची ! काय मेल्यांनीं भंडावून सोडलं होतं पण ! आतां झुंजारराव इथं एकटेच आहेत. ताई-साहेबांचा ह्मणून कांहीं तरी निरोप यांनां सांगून जावं निसटून इथून ! पण—पण ताईसाहेबांचा निरोप घेऊन मी या कपाटांत येऊन बसल्यें, असं सांगायचं कीं काय झुंजाररावांनां ?

[ आंतून 'बाईसाब ! झुंजारराव सरकार न्हैती आंतमंदी !'
' गुलामा खोटं बोलतोस; ते आहेत आंत ! मी त्यांनां अश्शी भेटायला जाणार !'
असा संवाद ऐकूं येतो. ]

**झुंजारराव**—काय गोंगाट आहे हा बाहेर ?

**गुलाब**—अगबाई ! आतां कसं करूं ? या खतः ताईसाहेबच आल्या ! ( घाईनें दार लावून घेते. )

[ तारा येते. ]

**तारा**—( स्वगत ) मनाचा धडा करून इथपर्यंत आल्यें खरी ! पण पुढं कसं करावं ? त्यारीच्या मनांतलं कालचं वादळ अजून शांत झालेलं नाहीं दिसत ! चंपाताईच्या त्या गौप्यामुळं माझ्या प्रियकराच्या प्रेमाला मी कायमची अंतरणार का ? अगबाई ! छे ! नाहीं—हा विचार दिखील मला नाहीं सहन होत ! —नाहीं, असं कधीं व्हायचं नाहीं ! त्यारीचं प्रेम मजवर आहेच आहे खास ! कालच्या वादळामुळं त्याच्यावर ढग आलेले दिसतात. माझ्या प्रेमाच्या अव्रानं ते लवकरच जातील वितळून; आतां करावीच सुरुवात ! ( उघड ) आपली गांठ घेणं फार मुष्किलीचं झालं आहे बाई ! सतरा चौक्या अन् अठरा पहारे ओलांडावे तेव्हां कुठं भेट झाली तर व्हायची !

**झुंजारराव**—आपण जर रंभाजीरावाला भेटायला आलां असाल, तर तो आतांच बाहेर गेला आहे.

**तारा**—नाहीं, मी आपल्यालाच भेटायला आल्यें आहें.

**झुंजारराव**—मला भेटायला ! आपला आणि माझा काय संबंध आतां ?

**तारा**—आपण ह्मटलं तरी आपला संबंध तुटणं शक्य नाहीं ! आपण अजून माझ्या प्रेमाच्या ऋणांत आहां.

**झुंजारराव**—माझे डोळे, माझे कान, माझी कल्पनाशक्ति यांनीं कट करून मला जर फसविलें नसेल तर मी तुझा ऋणी आहें खरा ! माझे डोळे अन् कान यांनां काल कांहींसुद्धां विकार झाला नव्हता !

**तारा**—त्यांनां विकार झालेला नव्हता हें जितकं खरं आहे, तितकंच मी अगदीं निष्कलंक आहें, हेंहि खरं आहे ! मी कबूल करतें, कीं, कालच्या एकंदर प्रकारावरून आपणाला संशय येणं अगदीं साहजिक होतं. पण परमेश्वराला स्मरून सांगतें, मी सीतेप्रमाणं शुद्ध आहें ! माझ्याकडून पतिव्रताधर्माला विपरीत असं कांहींसुद्धां घडलं नाहीं असं मीं आपणाला पुनः पुनः निक्षून सांगत असतांहि त्यावर आपला विश्वास बसूं नये, ह्मणजे मोठं आश्चर्य आहे ! यामागं माझ्या अकपट प्रेमाचा आपणाला कधीं अनुभव आला नव्हता का ? आपल्या परस्परांच्या आणाभाकांचं आपल्याला विस्मरण झालं का ? एक गुप्त रहस्य न फोडण्याबद्दल मी वचनानं बद्ध झाल्यामुळंच कालचा चमत्कारिक घोटाळा घडून आला, हें मी आपणास परमेश्वर स्मरून सांगितलं असतां अजूनहि त्यावर आपला विश्वास बसत नसल्यास आपलं मजवर खरं प्रेमच नाहीं, असं ह्मणणं ओघानंच प्राप्त आलं ! माझ्यावर आलेल्या घाणेरड्या आरोपाच्या निरसनार्थ मला जरा निक्षून बोलावं लागत आहे. यांत जर एखादा शब्द कठोर आला तर त्याबद्दल मला क्षमा करायची.

**झुंजारराव**—या बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं ! एखादा भगल वेदांती 'माया माया' ह्मणून आपल्या वाटेल त्या कृत्याचें समर्थन करूं पहातो, तसेंच ' रहस्य रहस्य ' ह्मणून तूं आपल्या दुष्कृत्यावर पांघरूण घालूं पहाते आहेस ! अशानें मी फसणार नाहीं ! या अवाढव्य विश्वांत ईश्वरानें जे जे रमणीय पदार्थ उत्पन्न केले आहेत त्या सर्वांत आजपर्यंत माझ्या डोळ्यांला तूं अतिशय मोहक-सुंदर वाटत होतीस; परंतु माझ्या डोळ्यांनीं माझ्या अंतःकरणास फसवून त्याला सर्वदा अशांततेचे भयंकर इंगळे लावावे, त्यापेक्षां त्यानां फोडून टाकणेंच चांगलें !

**तारा**—आपल्यावर जर माझं प्रेम नसतं तर मुद्दाम तें आहे असं भासविण्यांत मला काय फायदा होता ? आणि काल आपण मला नाहीं नाहीं त्या शब्दांनीं ताडण केलं असतांहि सर्व अपमान मुकाट्यानं गिळून मी यावेळीं आपल्या पायांपाशीं धावून कशाला आल्यें असतें ? खरं प्रेम मान, अपमान, संशय, संदेह, कशानंहि मळीण होत नाहीं.

**झुंजारराव**—तुझ्या या तत्त्वज्ञानाचा माझ्यावर कांहीं परिणाम होणार नाहीं!

[ दगड्या येतो. ]

**झुंजारराव**—कांरे? काय काम आहे तुझें इथें?

**दगड्या**—या कपाटांतला धनीसाबांचा रेसमी अंगरखा रफूवाल्याकडे न्यायचा है सरकार!

**झुंजारराव**—बरें तर, जा घेऊन जलदी!

**दगड्या**—( कपाट उघडून ) आर बापर! भ-भ-भू-भू-भू! भू-भूत!

[ पळून जातो.

**गुलाब**—अगबाई! सांपडल्यें ग सांपडल्यें! करा पायांनों आपलं काम आतां!

[ पळून जाते.

**तारा**—काय? कपाटांत बायकोला लपवून ठेवलेली! ठीक आहे!

**झुंजारराव**—कपाटांत स्त्री! काय आश्चर्य!

[ हिरोजी येतो. ]

**हिरोजी**—झाली तयारी—

**झुंजारराव**—गध्या! बोल, कशी आली ती या कपाटांत?

**हिरोजी**—क-क-को-ण क-क—

**तारा**—हिरोजी! आपल्या धन्याची अब्रु बचवायला काढ एखादी थाप शोधून!

**हिरोजी**—क-क-कसली-थ-थ-थाप- बाईसाहेब? ती इथें -त-त आली—

**झुंजारराव**—काय ह्मणतोस गाढवा? ती इथें आली?

**हिरोजी**—ह्म-ह्म-ह्मणजे न-न -नाहीं आली, सरकार! त-त-तिचें काम ध-ध-ध-धनीसाहेबांशीं—

**तारा**—तुझ्या अडखळण्यानं आलं माझ्या लक्ष्यांत सारं! नाहीं ना कांहीं तुला सुचत युक्ति?

**झुंजारराव**—गाढवा! खरें सांग काय तें लवकर! नाहीं तर बघ हा जंबियाच खुपशीन तुझ्या उरांत! ( जंबिया उगारतो. )

**तारा**—ह्मणजे कायतें समजलास ना हिरोजी! खरं न सांगतां कांहीं तरी खोटं सांगून दे, असं तुझ्या धन्याचं ह्मणणं!

**झुंजारराव**—सत्याला कुठें मरण नाहीं, समजलांत बाईसाहेब !

**हिरोजी**—( स्वगत ) कांहीं तरी सांगून वेळ मारून नेली असती ! पण मी इतका गोंधळून गेलों आहें, कीं, काय सांगावें तें सुचतच नाहीं !

**झुंजारराव**—हिरोजी ! जा झटकन् धावत आणि तिला शोधून घेऊन ये इथें ह्मणजे तिच्याकडून सारें समजेल काय तें !

**तारा**—नको जाऊं रे हिरोजी ! गेलास तर तुझ्या धन्याची फुकट फजिती होईल ! ( झुंजाररावास ) आपण एक तोड काढून समेट करूं या. आपण मला कालच्या प्रकरणाबद्दल प्रश्न करूं नये, अन् आतांच्या गोष्टीबद्दल आपणाला एक प्रश्नहि न विचारतां मी आपणाला क्षमा करायला तयार आहें !

**झुंजारराव**—चल जा ! तुझ्या क्षमेची मला जरूर नाहीं ! माझा जर तिळमात्र अपराध नाहीं, तर मला क्षमेची गरज काय ? तूं मात्र खरी अपराधी आहेस, तेव्हां ही संधि साधून आपला अपराध आणि माझा निरपराधीपणा यांचा गोंधळ करून आपला अपराध लपवूं पहात आहेस !

**तारा**—( स्वगत ) आतां निर्वाणींचंच अस्त्र योजलं पाहिजे ! ( उघड ) कपटी, बेमान कुठले ! आपला अपराध कबूल करण्याऐवजीं मलाच अपराधी ठरवून हवं तसं बोलतां काय? आपणाकडून असं असभ्यतेचं आचरण होईल, असं मला कधींच वाटलं नव्हतं ! पण ह्मणतात ना, भरंवशाच्या ह्मशीला टोणगा ! काल माझेवर गहजब केला तो असलीं हीं आपलीं घाणेरडीं कृत्यं लपवायला वाटतं ? अस्सं अस्सं ! आतां मला समजलं ! अन् अशा माणसाकडून झालेला अपमान पोटांत घालून मी वेडी क्षमा मागण्यासाठीं बाबांची कीं, कुणाची भीति न बाळगतां इथं धावत आल्यें ! मला काय ठाऊक, कीं, असलीं कृत्यं करायला एकपत्नीव्रताचं सोंग दाखवावं लागतं ह्मणून ? मी आपली तें खरंच समजल्यें. काय ती एकपत्नीव्रताची घमेंड ! तरीच त्या मेल्या दगड्यानं मला बाहेर अडविलं! अन् यांनां सूचना देण्यासाठीं मोठमोठ्यानं ओरडला ! आपण मला सांगितलं त्याप्रमाणंच मीहि आपणाला स्पष्ट सांगत्यें कीं, आपला अन् माझा आतां कांहीं एक संबंध राहिला नाहीं ! बाबांच्या इच्छेप्रमाणं मी देवाच्या सेवेंत आपलं आयुष्य घालवणार ! येत्यें तर मी आतां ! ( स्वगत ) या शेवटच्या मात्रेचा मात्र खात्रीनं कांहीं तरी उपयोग होईल.

[ जाते.

**झुंजारराव**—कठिण हृदया ! त्या कोमल मुखांतून निघालेल्या अनेक विनंतींचा धिःकार करून तूं आपलें पाषाणत्व चांगलें सिद्ध केलेंस ! तिच्या प्रेमाचा झुंजारराव! तुला अनुभव नाहीं का? मग तूं तिचा धिःकार कां केलास? तिचें असेल एखादें कांहीं तरी रहस्य ! त्याच्यासाठीं तूं इतकें अकांडतांडव कां करावेंस ? ती निष्कलंक आहे यांत लवमात्र शंका नाहीं ! तिनें आपल्या बापाच्या इच्छेला मान देऊन आत्मसमर्पण केलें तर लहानपणापासून वाढलेल्या माझ्या आशावृक्षाचा समूळ विध्वंस होणार ! काय ? ती मला कायमची अंतरणार ? छे ! नाहींच हा विचार सहन होत ! आतां तिच्याकडे जाऊन तिची प्रार्थना करून तिच्या या निश्चयापासून तिला परावृत्त केलेंच पाहिजे. त्याशिवाय इलाज नाहीं ! ( पाहून ) चोरा ! अझून तूं इथेंच ? सांग हरामखोरा ! ती स्त्री इथें लपून कशाला राहिली होती अन् कोण होती ती ! नाहीं तर—

**हिरोजी**—( हात जोडून ) आपण क्षमा कराल तर सांगतों सगळें सरकार !

**झुंजारराव**—बोल झटकन् !

**हिरोजी**—ती स्त्री ताराबाईची दासी गुलाब होती, सरकार ! आपणाला आतां सांगणें भागच आहे, आणि आपणाला ठाऊकहि असेल— आमचा दोघांचा बरेच दिवसांचा स्नेहसंबंध आहे. ती इथें मला भेटायला आली होती, सरकार ! जरा आमची बोलाचाली होत आहे इतक्यांत आपली हांक ऐकूं आली. आमचा स्नेह आपल्या नजरेस पडावा अशी तिची इच्छा नसल्यामुळें ती भिऊन या कपाटांत लपली ! आपण मला मघांशीं विचारलें तेव्हांच मीं आपणाला हें सांगितलें असतें; परंतु तिची धनीण इथें होती, तिला हें कळून उपयोगी नव्हतें. ही सगळी हकीगत आपणाजवळ अगदीं खरी खरी सांगितली आहे, सरकार !

**झुंजारराव**—यांत जर कांहीं लबाडी असली तर संभाळून रहा, माझ्याशीं गांठ आहे ! जा, पळ. तारा नीट आपल्या घरींच जाते कीं काय तें पाहून मला येऊन सांग.

**हिरोजी**—बरें आहे, सरकार !

**झुंजारराव**—जा तर, पळ गड्या ! ( हिरोजी जातो. ) माझ्या दृढ प्रेमाबद्दल तिची खात्री केली पाहिजे. आह्मा प्रणयिलोकांचें अंतःकरण किती अनिश्चयी असतें पहा ! अबला ह्मणून गाजलेल्या स्त्रीजातीची, आह्मासारख्या प्रबल

पुरुषांनां खेंचून आपल्या ताब्यांत आणणारी केवढी प्रचंड शक्ति ही ! स्त्रियांचा हा जुलूम झुगारून देण्यासाठीं आह्मीं कितीहि धडपड केली तरी ती विफल होऊन आह्मांला त्यांनां शरण जावें लागतेंच !

[ जातो.

---

## प्रवेश ४ था.

[ स्थल—वसंतबाग. दौलतरावाशीं बुरखा घेतलेली चंपा बोलत आहे, व कांहीं अंतरावर पिन्या उभा आहे, असा प्रवेश. ]

**दौलतराव**—तर मग मीं तुमच्याबरोबर तुमच्या घरीं येऊं नये, असें ह्मणतां ?

**चंपा**—होय. आपण मजबरोबर येऊं नये, असं माझं ह्मणणं आहे. कारण, हल्लीं माझी स्थितिच तशी चमत्कारिक झाली आहे. आपलं ह्मणणं मला कबूल करतां येत नाहीं.

**दौलतराव**—कांहीं हरकत नाहीं. मी तुमचेबरोबर येऊं नको तर तुह्मी मजबरोबर चला. इथें जवळच रंभाजीराव नांवाच्या माझ्या एका स्नेह्याचें घर आहे, तिथें आपण जाऊं. तुमच्या या कुंजपुर शहरांत त्याच्या सद्गुणांबद्दल मोठी ख्याती आहे. त्याच्यावर विश्वास ठेवून त्याच्या घरीं जायला कांहीं हरकत नाहीं !

**चंपा**—( स्वगत ) अगबाई ! रंभाजीरावांचं घर इथून जवळच का आहे ? तर मग मला इथून लवकरच पाय काढला पाहिजे.

**दौलतराव**—मग येतां का त्याच्या घरीं ? आपली परस्परांची गांठ पडायला ही जागा ठीक होती; परंतु आतां या वेळेस आपणासारख्यांला बोलत बसायला हें स्थळ बरें नाहीं.

**चंपा**—तें खरं ! आपल्या मित्राकडेहि मला येतां येणार नाहीं. मीं बोलावल्याप्रमाणं आपण आलांत हे मजवर आपले उपकार आहेत. आपल्या मघांच्या उद्गारांवरून आपण इथले नाहींत, असं दिसतं.

**दौलतराव**—होय, मी इथला रहाणारा नव्हें. मी रामनगरास असतों.

**चंपा**—आपलं नांव ऐकण्याची कालपासून मनाला फार उत्कंठा उत्पन्न झाली आहे !

**दौलतराव**—माझें नांव दौलतराव. (स्वगत) हे प्रश्न विचारण्याची हिला काय बरें जरूर ?

**चंपा**—आपल्याला वाईट वाटणार नाहीं तर आणखी एकदोन प्रश्न विचारण्याचं धाडस करीन ह्मणलें.

**दौलतराव**—खुशाल विचारा !

**चंपा**—आपल्या कुटुंबाचं नांव काय बरं ?

**दौलतराव**—( हंसत ) मला पत्नी असती तर तिचें नांव घ्यायला मी कांहीं लाजलों नसतों! माझें अद्यापि लग्न झालेलें नाहीं !

**पिऱ्या**—(एकीकडे)धनीसाब आन् ही आबा इक्त गुलुगुलु काय बोलत्याती कुनाला ठावं! काय का असना, त्येची चौकशी करुनशान् आपनाल्ही काय करायच हाय ? आपुन तर उभा राहुनशान् लई कंटाळलो. घेऊया वाइच डुलकी ! ( निजतो. )

**चंपा**—(स्वगत) तारा वहिनींच्या घरांतून इथपर्यंत यायचं धाडस केलं खरं, पण त्याचा उपयोग फार चांगला झाला. माझ्या प्रियकराला पोट भरून पहायला मिळालं, त्यांची सर्व हकीगत कळली, अन् सर्वांत विशेष हें कीं, त्यांचा विवाह झालेला नाहीं हें समजलं. कुठं तो स्मशानांत लांकडं गेलेला मेला अष्टावक्र जांबुवंत अन् कुठं हे ऐन तारुण्याच्या भरांत आलेले, केवळ दुसरे मदनच, असे माझे प्रिय प्राणनाथ ! पण या हतभागिनीला यांची प्राप्ति होईल तेव्हां खरी ! सर्वांत मोठी अडचण ही कीं, हे स्वतःच मला पदरांत घ्यायला कबूल होतात कीं नाहीं ! कांहीं तरी युक्ति करून तारावहिनींची मदत घेऊन याचा उलगडा केला पाहिजे. असो. माझं काम तर झालं. आतां इथून पाय काढला पाहिजे.

**दौलतराव**—विचार कसला चालला आहे? झाले विचारून तुमचे प्रश्न ?

**चंपा**—होय, झाले. माझ्या इथं येण्याचा उद्देश सफळ झाला. आतां मी जातें.

**दौलतराव**—वाहवा ! ह्मणजे ? काल पत्रांत लिहिलेंत तसें तर कांहींच घडून आलेलें दिसत नाहीं !

**चंपा**—मीं पत्रांत लिहिलं तें कांहीं खोटं नाहीं. पण त्याप्रमाणं घडून यायला थोडासा अवकाश आहे. यापेक्षां याबद्दल मला आतां अधिक उलगडा करतां येत नाहीं, याबद्दल क्षमा असावी.

**दौलतराव**—या तुमच्या वर्तनाचा अर्थ माझ्या ध्यानांत येत नाहीं. अशी रीतीनें माझ्या तोंडाला पानें पुसायची इच्छा होती तर मला माझ्या उबदार मऊ बिछान्यांतून उठवून थंडींत इथपर्यंत येण्याचे फुकट श्रम तरी कां दिलेत? एखाद्या भुकेनें मृतप्राय झालेल्या मनुष्यापुढें उत्तम पंचपक्वान्नांचें ताट आणून तो त्याला शिवणार इतक्यांत तें उचलून न्यावें, असेंच तुह्मी हें करतां आहां ह्मणायचें !

**चंपा**—तुह्मी माझ्या कृतीला वाटेल त्या उपमा द्या, सध्या यापेक्षां इथं उलगडा होणं शक्य नाहीं !

**दौलतराव**—पण मी ह्मणतों, थोडासा तरी उलगडा कुठें झाला आहे ? बरें पण-पण-तें पंचपक्वान्नांचें ताट तरी मला पाहूं द्या! काढा पाहूं तो बुरखा!

**चंपा**—अंहं ! तसं व्हायचं नाहीं ! पत्रांतल्या सूचनेची आठवण आहे ना ? बरं दौलतराव, मी येखें आतां ! ( जाऊं लागते. )

**दौलतराव**—हां हां ! जाऊं नका-जाऊं नका !

**चंपा**—हां ! एक पाऊल पुढं आलांत कीं मी हातची गेल्यें असं समजा ! तुमच्या जिज्ञासेला तूर्त आळा घाला. सभ्यतेस उचित असं वर्तन ठेवा ! मग मी तुमचीच आहें !

[ जाते.

**दौलतराव**—झाला पुनः आंधळे कोशिंबिरीचा खेळ सुरू! पण बाईसाहेब ! तुह्मी शेर तर मी सवाशेर आहें, हें पक्कें ओळखून ठेवा. तुमचा चेहरा नाहीं तर नाहीं, पण पिऱ्यानें जर मीं सांगितलेली कामगिरी इमानानें बजावली तर निदान तुमचा पत्ता तरी काढल्याखेरीज रहात नाहीं ! तुमचा पत्ता समजल्यावर तुह्मी कोण हें हं हं ह्मणतां शोधून काढीन !—पण हें काय ? हा पिऱ्या-हा गाढवाचा लेक इथेंच स्वस्थपणें घोरत पडला आहे ! अरे हरामखोरा ! ( पिऱ्याजवळ जाऊन त्याला ठोसे मारित ) गाढवा पिऱ्या ! तुला काय सांगितलें होतें मीं ? ( त्याचा कान धरून) अशाच रीतीनें माझे हुकूम पाळित असतोस चोरा, नाहीं का ? ( पिऱ्या जांभया देत डोकें खाजवित उभा रहातो. )

**पिऱ्या**—हे बगा ध-धनी-स-साब, म-मी !

**दौलतराव**—मी-मी काय करतो आहेस गध्या ?

**पिऱ्या**—एवढा योक वखत माफ करा धनीसाब ! म्यां काय ह्मटलं, की धनीसाबांच्या तडाक्यांत एकदा ती आवा घावल्यावर, तिला ते तस जाऊ येनार हैत ? असा इचार करूनशान् बाइच डुलकी घेतली सरकार !

**दौलतराव**—गप रहा हरामखोरा ! जा असाच धावत तिच्यामागें. पहातोस काय ? बेशरम कुठला ! तिचा पत्ता काढून आल्याखेरीज मला तुझें तें काळें तोंड दाखवूं नकोस ! चल चालता हो !

[ पिऱ्या जातो.

**पिऱ्या**—ह्यो इचिभन न्याव झाला का काय ? बाइच जराशी कुठ डुलकी घेतली आन् त्याबद्दल धनीसाबांनीं माह्मी इक्तं बदाड बदाड बदडाव ? आन् धनीसाब पारदिवसासर बिछान्यामंदीं लोळत्याती तवां ? रात न्है दीस न्है, सारखा शंभर कोस धनीसाबामागनं कुत्र्यावानी या कुंजपुराला दौडत आलों त्येच्याबद्दल ह्ये बक्षीस व्हय ? बैलात का जाईना ती जखीन ! पन आपुन हुकुमाच चाकर ! तिचा पत्ता कसबी करूनशान् धनीसाबाह्मी सांगाया होवा ! न्हाई पत्त्या काढलास त्योका पिऱ्या ! तर धनीसाब तुज तोंडबी न्हाई पघनार पघ ! आतां तिचा पत्ता घावतो कसा ?

[ तारा येते. पिऱ्या तिच्याजवळ जातो. ]

**पिऱ्या**—लई ब्येस झाल पघा बाईसाब ! आह्मी घेवच पावलान् काय ! म्यां ह्मटलं, फिरूनशान् तुमची गाठ पडतिया का न्है कोन जान !

**तारा**—अगबाई ! काय तरी बाई ह्मणतो हा ?

**पिऱ्या**—लइ वंगाळ परसंग आनला व्हता ताईसाब, तुमीं या पिऱ्यावर ! जर का तुमी माह्मी भ्येटला नसतां आतां, तर धनीसाबांनीं आपल्या चाबकानं एका पिऱ्याच दोन पिऱ्ये करुनशान् टाकल असत की बाईसाब !

**तारा**—अगबाई ! हा मेला कुणीं दारुड्या आहे वाटतं ! अगदीं तर्र झालेली दिसते खारी !

**पिऱ्या**—न्हाई ताईसाब ! आह्मी या माळच्यान् आज पा सा रोजांत दारुला शिवलोबी न्हाई पघा ! धनीसाबांच्या मागनं दौडता दौडतां ब्येजार ! धनीसाबाह्मी जर का तुमची बातमी न्हाई सांगितली म्यां, तर ते माझं डोक्सं फोडूनशान् माह्मी तर्र करतील ह्ये मातुर खरं !

**तारा**—चल हो बाजूला अन् जा आपल्या वाटेनं मुकाट्यानं ! नाहीं तर तुझी हड्डी नरम करवीन बघ कशी ती मेल्या !

**पिऱ्या**—नग नग बाईसाब ! तेवड मातुर नका करूं ! आतांच धनीसाबांनीं माझी मायंदळ पलाखतीचा मार देऊनशान् माझी हाडं अगदीं खिळखिळी केलिती !

**तारा**—कोण तुझे धनीसाहेब हे ?

**पिऱ्या**—अस काय करतां बाईसाब ! का उगीच छळता या पिऱ्याला ? थोड्या वखतापूर्वी तुमी बोलत व्हतां त्यांच्या संग, आन् अस काय इचारता ? नका आतां अंत बघूं या पिऱ्याचा !

**तारा**—( एकीकडे ) मी चुकल्यें ! हा दारुबाज नाहीं. वेडा आहे कुणी तरी ! किंवा मला हा दुसरीच कुणी समजतो आहे. याच्याशीं अशीच बोलत बसल्यें तर मीहि अशीच वेडी व्हायची !

[ जाते.

[ हिरोजी येतो. ]

**हिरोजी**—( दूर पहात ) गेल्या ताईसाहेब, आपल्याच घरीं गेल्या.–पण ही खारी त्यांच्याशीं इतका वेळ काय बोलत होती ? याच्यापासून युक्तीनें काढलें पाहिजे ! धनीसाहेबांनां खुष करण्यासारखी कांहीं तरी बातमी याच्याकडून कदाचित् आपणाला मिळेल !

**पिऱ्या**—आर इच्याभन ! गेली कीं चुकवूनशान् मला ! तिच्यासंग इक्तं बोललो, पन् तिचा पत्ता मातुर न्हाई कांइ लागला ! पन कुनाला तरी इचारुन-शान् घेऊं त्या वाड्याच्या धन्याचं नांव ! त्याच वाड्यामंदीं गेली ती आवा ! ( हिरोजीस पाहून ) राव ! त्यो वाडा कुनाचा त्यें है का दखल तुमाला ?

**हिरोजी**—होय. वाड्याच्या मालकाचें नांव संभाजीराव शिरके !

**पिऱ्या**—आन् आतांच कुनी आवा त्या वाड्यामंदीं गेलेली पाइली तुमीं ?

**हिरोजी**—होय पाहिली.

**पिऱ्या**—कोन ती आवा ?

**हिरोजी**—ती संभाजीराव शिरक्यांची मुलगी ताराबाई. ( स्वगत ) इतकी बारीक चौकशी कां बरें करतो आहे हा गुलाम ? इथें कांहीं तरी मख्खी आहे खास !–काय राव, आज थंडी तर फार पडली आहे ! येतां का घेऊं थोडीशी त्या पलीकडल्या कलालाकडे ?

**पिऱ्या**—व्हय व्हय !. चला की !

**हिरोजी**—तुमची आमची ओळख आज दाट झाली आहे. त्याची आठवण आज पक्की करून टाकूं.

**पिऱ्या**—तुमी व्हा म्होर, हा आलोच की मी तुमच्यामागून !

**हिरोजी**—या बरें का पण ! मी होतों पुढें.

[ जातो.

**पिऱ्या**—काय म्हनला ह्यो ? संभाजीराव शिरके न्हे का ? आन् ती आबा त्याचीच पोरगी ताराबाई ! आतां न्हाइ मी कंद्दीबी इसरनार ह्यें ! जस माज ह्ये दांत माज्या तोंडामंदीं हैती, तस्सच ह्येबी माज्या टालक्यामंदीं न्हानार ! चला आतां जाऊनशान् घेऊं थोडीशी ! पन कशी–? अक्शी जलाल हां ! आन् मग धनीसाबांम्ली सांगूं ही बातमी ! ही लइ खुस खबर ऐकूनशान् धनीसाब खूस होऊन माज्या हातांत कडी ठोकणार खास! चल, लाट है आन् काय तुजी आतां पिऱ्या !

[ पडदा पडतो. ]

# अंक चवथा.

## प्रवेश पहिला.

[ स्थल—तारेचा महाल. तारा व चंपा बोलत
बसल्या आहेत, असा प्रवेश.]

**चंपा**—वहिनी ! मी मघांपासून तुमची सारखी वाट पहात आहें ! कुठं गेलां होतां तुह्मी ? तुह्माला एक आनंदाची बातमी सांगायची आहे ! माझं दैव उघडलं !

**तारा**—होय चंपाताई ! तुमचं सुदैव उघडलं त्याच घटकेपासून माझं दुर्दैव उभं राहिलं आहे !

**चंपा**—इडा पिडा टळो अमंगळ पळो ! काय बोलतां हें वहिनी ? तुमच्या-सारख्या भाग्यशाली स्त्रीची कशाला गोष्ट पाहिजे ? मी इतकी हतभागी, पण माझं दुर्दैव आतां खास खास नाहींसं झालं !

**तारा**—तुमचं नाहींसं झालं, पण माझं सर्वस्वी उभं राहिलं आहे ना !

**चंपा**—माझ्या हृदयांत कालपासून खेळत असलेल्या प्रियकराची अन् माझी आज भेट झाली !

**तारा**—अन् कालपासून माझ्या हृदयाला भयंकर यातना देणाऱ्या अशा एका माणसाशीं माझीहि आज भेट झाली !

**चंपा**—तारावहिनी ! तुमच्याजवळ माझं एक मागणं आहे. आपले कालपासून माझेवर अपरिमित उपकार झाले आहेत, त्यांतच आणखी एका उपकाराची भर घाला, असं तुह्माला सांगणं माझ्या जिवावर येतं ! माझ्यामुळं तुमच्यावर काल काय प्रसंग आला, हेंहि मला ठाऊक आहे. आपले उपकार माझ्याकडून जन्मजन्मांतरींदिखील फिटायचे नाहींत. वाघाच्या दाढेंत शिर-लेल्या गाईला वांचविण्याचं पुण्य तुह्मीं घेतलंत, तें पुरतं घ्या, एवढंच तुमच्या-जवळ मागणं आहे.

**तारा**—तुह्मी काय ह्मणतां चंपाताई ! मला नाहीं कांहीं समजत !

**चंपा**—काल तुह्मीं मला आश्रय देऊन त्या मेल्या आनंदरावाच्या तोंडांतून वांचविलीत खरं, पण पुन्हा तो वाघ माझ्यावर उडी घातल्याखेरीज राहणार नाहीं. काल ज्यांनीं माझं रक्षण केलं, तेच माझ्या सर्व जन्माचेहि रक्षणकर्ते व्हावे, असा ईश्वराचा संकेत नसेल कशावरून ? त्यांच्या पदरीं मला आतां

तुह्मीच घाला, असं तुह्माला स्पष्टपणं सांगणं भाग आलं आहे. पण माझे प्रियकर मला पदरांत घ्यायला तयार होतील की नाहीं, हें शोधून काढण्यांत तुह्मीं मला प्रथम सहाय्य केलं पाहिजे.

**तारा**—खरंच, तुह्मीं मला काल केलेल्या सहाय्याची मीं अशीच फेड केली पाहिजे !

**चंपा**—हें असं काय बरं बोलतां आज तारावहिनी, तुह्मी ?

**तारा**—कांहीं नाहीं ! चंपाताई ! मी खरं सांगलें, प्रेमाचीं रहस्यें मला कांहीं चांगलींशीं उकलत नाहींत. मला नुकतंच एक रहस्य समजलं आहे, त्यामुळं माझ्या हृदयाला मात्र भयंकर यातना होत आहेत. झुंजारराव माझ्याशीं बेमान झाले !

**चंपा**—अशक्य ! अगदीं खोटं !

**तारा**—अगदीं खरं ! तिळमात्र खोटं नाहीं ! !

**चंपा**—कुणा दुष्टानं खोटंनाटं सांगून दादाविषयीं तुमचं मन कलुषित केलेलं दिसतं !

**तारा**—छे छे ! चंपाताई ! माझं त्यांच्यावर इतकं दृढ प्रेम होतं–हो, होतं असंच ह्मणायची आतां पाळी आली आहे—कीं, त्यांच्याबद्दल कुणीं कांहीं प्रत्यक्ष पाहिल्याचं जरी मला सांगितलं असतं तरी तें प्रेम तिळमात्र कमी झालं नसतं. लोकांवर मी कधींच विश्वास ठेवित नाहीं. लोकांच्या तोंडच्या खोट्यानाट्या, तिखटमीठ लावलेल्या बातम्यांवर विश्वास ठेवून व्यर्थ कुशंका घेणारी बायको मी नव्हें. आज त्यांच्या बेमानपणाचा पुरावा प्रत्यक्ष या डोळ्यांनीं पाहिला !

**चंपा**—तर मग माझ्यासारखी दुर्दैवी मीच ! दादाचा अन् तुमचा संबंध तुटला, तर मग आतां तुमच्या स्नेहाला मी पात्र नाहीं.

**तारा**—चंपाताई ! मग माझी अझून तुह्माला परीक्षा झाली नाहीं, असंच ह्मटलं पाहिजे! तुमचा माझा स्नेह तिसऱ्या कुणावर अवलंबून आहे असं का तुह्माला वाटतं? तसं कांहीं दिखील मनांत आणूं नका! तुमच्यासाठीं मी काय वाटेल तें करीन !

**चंपा**—धन्य आहे तुमच्या उदार स्वभावाची ! पण तारावहिनी ! दादा तुमच्याशीं बेमान झाला, असं तुह्माला वाटायला कारण तरी काय झालं ?

**तारा**—त्याची वाटाघाट पुढं करूं कधीं तरी ! पण मघांशीं तुह्मी ह्मणालां होतां तें कसलं सहाय्य माझ्याकडून तुह्माला होण्यासारखं आहे, सांगा बरं !

**चंपा**—सांगल्यें. काल ज्यांनीं माझं रक्षण करून मला इथं आणलं, त्यांची मीं आज सकाळीं वसंतबागेंत गुप्तपणानं भेट घेतली. असल्या कामाला मी अगदीं अपरिचित, कसं होईल काय होईल असं मला वाटत होतं; पण माझं सारं आयुष्य या एका गोष्टीवर अवलंबून असल्यामुळं मला त्यांची भेट घेणं अवश्यच होतं! माझ्या प्रियकराशीं जें आज माझं थोडंसं भाषण झालं, त्यावरून ते सुशील, निष्कपटी–पण जरासे रंगेल आहेत, अशी माझी खातरी झाली. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, ते अझून अविवाहित आहेत असं कळलं. त्यांनीं जर मला पदरांत घेतली, तर मी जन्माची सुखी होईन, असा मला पक्का भरंवसा वाटतो. त्यांचे माझ्यावर अतिशय उपकार तर आहेतच! त्या उपकारांनीं बद्ध होऊन, त्यांच्या अप्रतिम रूपगुणांवर भाळून ह्मणा हवं तर, अन् मुख्यत्वेंकरून त्या राक्षसाच्या हातून माझी सुटका व्हावी ह्मणून त्यांच्या चरणीं मीं आपलं सर्वस्व अर्पण करायचा निश्चय केला आहे. तुह्मी मजवर रागावणार नाहीं अशा समजुतीनं त्यांनां इथं बोलावून आणायला मीं गुलाबला पाठविलं आहे.

**तारा**—इथं बोलावून आणायला! कशाला बाई तें?

**चंपा**—त्यांच्यापाशीं विवाहाची गोष्ट काढावी ह्मणून.

**तारा**—तुह्मी स्वतःच त्यांनां विचारणार का?

**चंपा**—नाहीं वहिनी! हें काम माझ्यासाठीं तुह्माला केलं पाहिजे.

**तारा**—तुह्मी हें काम माझ्यावर सोंपवतां खरं, पण माझींच कामं मला नीटशीं होत नाहींत, याचा तुह्मीं विचार केलात का? नुसत्या रूपावर भाळून किंवा कृतज्ञतेनं प्रेरित होऊन ज्याचं नांवगांवहि आपल्याला नीटसं ठाऊक नाहीं अशा मनुष्याला आपलं सर्वस्व वहायला तयार होणं, मला कांहीं पसंत नाहीं! आज तुह्मी त्यांनां भेटलांत हेंच माझ्या मतं मुळीं गैर झालं अन् त्यांनां तुह्मीं इथं बोलवायला पाठविलंत ही तर मोठीच चुक झाली, असं मला वाटतं. तुमच्यामुळं माझेवर काय प्रसंग आला आहे हें माहीत असतां तुह्मीं आणखी अधिक संकटं ओढून आणावीं, हें बरं नाहीं.

**चंपा**—होय वहिनी! तुमच्यावर मजमुळं केवढीं संकटं आलीं आहेत हें मला माहीत असतां निवळ आपलपोटेपणानं मी अंध झाल्यें हें खरं, परंतु—(रडूं लागते.)

**तारा**—चंपाताई! क्षमा करा--दुःखाच्या भरांत मी तें बोलून गेल्यें! माझी मोठी चूक झाली. माझेपेक्षां तुमच्यावरचा प्रसंग बिकट आहे हें माझ्या लक्ष्यांत राहिलं नाहीं.

**चंपा**—तारावहिनी! तुमचे उपकार जन्मोजन्मीं माझेकडून फिटणार नाहींत. एवढी ही माझी शेवटची विनंति मान्य करून माझं जन्माचं कल्याण केल्याचं श्रय घ्या! माझी खातरी आहे, कीं, तुमच्या प्रयत्नाला यश आल्या-खेरीज रहाणार नाहीं. त्यांच्याशीं माझा विवाह झाला, म्हणजे या माजलेल्या सर्व घोटाळ्याचा थोडक्या वेळांत उलगडा होईल. माझ्या या एका गौप्यामुळं तुमचीं मनं एकमेकांविषयीं कलुषित झालीं आहेत खास! हा घोटाळा नाहींसा होतांच दादा तुमच्या पायापाशीं क्षमा मागण्यासाठीं लोटांगणं घालित येईल!

**तारा**—पहा बाई! पुरता विचार करा. पुढंमागं या कृत्यांचा पश्चात्ताप होण्याची पाळी येऊं नये, म्हणजे झालं. बरं, काल त्यांनीं इथं आणलेली स्त्री ती तुम्हीच, हें त्यांनां माहीत आहे का?

**चंपा**—नाहीं! मुळींच नाहीं. आज मीं बुरखा घेऊन त्यांची भेट घेतली. आणि हें घर त्यांनां उमगूं नये, म्हणून मागच्या वाटेनं त्यांनां बागेंत घेऊन यायला मीं गुलाबला सांगितलं आहे.

**तारा**—अगबाई! त्याच वाटेनं झुंजारराव नेहमीं येतात. कदाचित् पुनः कशासाठीं स्वारी इथं आली, अन् त्यांची गांठ पडली तर मग कसं? छे छे! चंपाताई! हा बेत तुम्हीं मला अगोदर कळविला असता, तर बरं झालं असतं!

[ गुलाब येते. ]

**गुलाब**—बाईसाहेब! दौलतराव तुमची वाट पहात आहेत.

**तारा**—(गुलाबला) अन् बाईसाहेब! या अरुल्या कामाला मला कळविल्या-शिवाय तुम्ही कशा गेलांत?

**गुलाब**—ठीक ठीक! मुर्दंगाला दोहींकडून मार!

**चंपा**—वहिनी! गोष्ट होऊन चुकली! मजकडून अविचार अन् घाई झाली खरी, पण माझी सुटका होऊन तुम्हा सर्वांचीहि 'सुटका' व्हायला हें असं कांहीं तरी करणं भाग होतं.

**तारा**—होय, एका अर्थी तेंहि कांहीं खोटं नाहीं! बरं, मीं काय करायचं आतां? तुम्हीच सांगा.

**चंपा**—गुलाब ! तूं दौलतरावांनां इथं घेऊन ये. ( गुलाब जाते. ) तोंपर्यंत या पलीकडल्या खोलींत तुह्माला सगळं सांगल्‍वें, या.

[ जातात.

[ गुलाब व दौलतराव येतात. ]

**गुलाब**—तुह्मी बसा इथं, आत्तां येतील बाईसाहेब.

[ जाते.

**दौलतराव**—काय चमत्कार आहे पहा ! एकामागून एक तीन पांखरें एका दिवसांत माझ्या हातीं आलीं—परंतु मजा ही कीं, त्यांतल्या एकाचीहि प्राप्ति झाली नाहीं ! हें कुंजपुर शहर ह्मणजे चमत्कारांचें आगरच आहे ह्मणायचें ! पण शिकार जर हातीं लागेना, तर तिच्यामागून धावाधाव करायची कशाला ?

[ तारा बुरखा घेऊन येते. ]

**दौलतराव**—हें काय आणखी प्रकरण ! इथें जिकडे जावें तिकडे बुरख्याशीं प्रसंग ! अहाहा ! आकृति तर फारच गोड आहे ! तेव्हां रूपहि तसेंच असेल, असें अनुमान करायला कांहीं हरकत नाहीं. बाईसाहेब ! आपल्या आज्ञेप्रमाणें हा बंदा इथें आला आहे. आपला हुकुम पाळायला हा दास तयार आहे !

**तारा**—खरं ना पण हें ?

**दौलतराव**—आपली आज्ञा भलती सलती नसेल तर !

**तारा**—आपलं नांव काय बरं ?

**दौलतराव**—दौलतराव ! ( स्वगत ) काल मीं त्या स्त्रीला पोंचविली ती इथेंच खास ! होय ! तोच हा महाल ! मना ! तुझी आशा सफल होईल का ?

**तारा**—दौलतराव ! तुह्मी आजपर्यंत बरेच फिरलां असाल, नाहीं बरं ?

**दौलतराव**—होय, बरेच ठिकाणीं फिरलों आहें. कां बरें ?

**तारा**—तर मग आपल्या कुटुंबाला विरह—

**दौलतराव**—अं हं ! मला पत्नी नाहीं. मीं अझून लग्न केलें नाहीं.

**तारा**—अझून लग्न केलं नाहीं ! कां बरं ?

**दौलतराव**—आजपर्यंत मी स्त्रीजातीचा द्वेष्टा होतों !

**तारा**—अगबाई ! पण आह्मा स्त्रियांविषयीं अझूनहि तीच भावना आपल्या मनांत आहे का ?

**दौलतराव**—मुळींच नाहीं ! कांहीं कारणानें स्त्रीजातीविषयींचें माझें तें मूर्खपणाचें मत अजिबात फिरलें ! इतकें फिरलें कीं, आतां प्रत्येक स्त्रीबद्दल

मला विलक्षण प्रेम वाटूं लागलें आहे! आजपर्यंत अप्सरांनांहि आपल्या रूपानें खालीं पहायला लावणाऱ्या रमणी मला अत्यंत कुरूप भासत असत, आणि आतां अत्यंत कुरूप तरुणीसुद्धां मला अप्सरेप्रमाणें वाटते! लोकांची नजर पहिल्यानें चांगली असून नंतर वयपरत्वें वाईट होते, आणि माझी नजर पूर्वी वाईट होती ती माझ्या वयाबरोबर अधिकाधिक चांगली होत जात आहे! माझ्या म्हातारपणापर्यंत माझी नजर किती निवळणार आहे कोण जाणे!

**तारा**—अस्सं! कोणत्या कां कारणानं असेना, आह्मां स्त्रियांबद्दल आपलं वाईट मत होतं तें फिरलं, हें ऐकून मला फार आनंद झाला! आपलं हें मत बदलून बरेच दिवस झाले असतील, नाहीं?

**दौलतराव**—तसे फारसे नाहीं झाले कांहीं!

**तारा**—दौलतराव! इतके तुह्मी फिरलां सवरलां, अन् तुमच्या मनाजोगी स्त्री तुह्माला कुठंच कशी आढळली नाहीं?

**दौलतराव**—( स्वगत ) आतां पहावा दगड टाकून! ( उघड ) आपण रागावणार नाहीं, तर आपल्या या प्रश्नाला उत्तर देईन ह्मणतों!

**तारा**—कांहीं हरकत नाहीं–सांगा.

**दौलतराव**—तर मग आपल्या प्रश्नाचें उत्तर 'होय, आढळली आहे!'

**तारा**—कुठं बरं?

**दौलतराव**—आपल्या या प्रांतांत! फार कशाला? या शहरांतच ती माझी हृदयस्वामिनी आहे!

**तारा**—मग कदाचित् ती माझ्या ओळखीचीहि असेल! तिचं नांव आपल्याला सांगतां येईल का?

**दौलतराव**—मघांशीं मी आपल्याला सांगायला विसरलों. माझी प्रिया याच घरांत आहे—काय बरें तिचें नांव तें—

**तारा**—बः!

**दौलतराव**—काय बरें तिचें नांव तें—पहा हो–हं–हं–तुमच्या–नांवा-सारखेंच जवळ जवळ तें आहे!

**तारा**—दौलतराव! आपला आशय मी समजल्यें. पण ती भाग्यवती स्त्री मी नव्हें, अन् तिचं भाग्य लुबाडून घ्यायची माझी इच्छाहि पण नाहीं!

**दौलतराव**—अरे अरे अरे! तर मग फारच वाईट गोष्ट! (स्वगत) काय माझें नशीब पहा! हेंहि सावज हातून निसटतें वाटतें? तर मग मघांपासून

हिनें प्रश्नांची गर्दी केली ती उगीच ह्मणायची! आतां कानाला खडा लावून घेतला, कीं, निदान या कुंजपुर शहरांत तरी असल्या भानगडींत पुन: कधीं पडायचें नाहीं! उगाच हिच्या चिठीनें तोंडाला पाणी सुटून तिकडे जा, तिच्या निरोपावरून इकडे ये, अशी धावाधाव करून शेवटीं लभ्यांश कांहीं नाहीं! जीव मुठींत घेऊन आपण यावें, कुणी तरी बुरखेवाल्या बाईनें कांहीं तरी प्रश्न विचारावे, कीं, आटोपला कारभार! असें होतें आहे!

**तारा**—मग काय दौलतराव! माझ्या प्रश्नाला तुह्मीं उत्तर दिलं नाहीं? दौलतराव! आपण असे विचारांत कां पडलां? मनांत कांहींसुद्धां आणूं नका अन् माझ्या प्रश्नाचं उत्तर द्या. आपला त्यांत कांहीं तरी फायदाच होईल!

**दौलतराव**—( स्वगत ) काय प्रकरण आहे कांहीं कळत नाहीं! फायदा होईल असें ही ह्मणते, अन् माझी पत्नी व्हायला कबूल नाहीं असेंहि भासविते! तेव्हां या विरुद्ध भाषणांचा मेळ तरी कसा बसवायचा? कांहीं का असेना! आपल्या मनांतलें एकदा हिला अगदीं स्पष्ट स्पष्ट सांगून टाकावें! झाला तर त्यानें फायदाच होईल; नुकसान कांहीं होत नाहीं! फार तर हात हलवित इथून पुन्हा जावें लागेल! प्रेमाच्या व्यवहारांत अशा हेलपाट्यांनीं अन् धक्यांनींच प्रणयाची गोडी वाढत असते! ( उघड ) मीं सांगितलें असतें, परंतु कदाचित् आपण रागावून मला असभ्यसुद्धां ठरवाल, अशी मला भीति वाटते.

**तारा**—मुळींच नाहीं! आपण माझ्या गैरमर्जीची परवा न करतां खरं असेल तें बेलाशक सांगा. मला त्यापासून कांहीं वाटायचं नाहीं. आपण समजतां इतकी आपणासंबंधानं मी गैरमाहितगार नाहीं, हें आपण ताडलंच असेल!

**दौलतराव**—तर मग मी स्पष्टपणें सांगतों. कालच मी या शहरांत आलों. काल संध्याकाळीं काळोख पडायच्या सुमाराला एका खिडकींतून एक तरुण स्त्री खालीं पडणार तों वरचेवर मीं तिला झेलली. अहाहा! काय सांगूं तुह्माला तिचें लावण्य! ज्याप्रमाणें विद्युल्लता क्षणमात्र चमकून लोकांच्या नेत्रांस आपल्या उज्ज्वल रूपाचा पूर्णपणें परिचय करून देते, त्याप्रमाणें त्या सुंदरीचें रूप अल्पकाळच माझ्या दृष्टीसमोर असतांहि मला त्याची उज्ज्वलता पूर्णपणें कळून आली! खरोखर, ती सुंदरी कृतघ्न ह्मणायची! कारण, मीं ज्या हृदयावर वरचेवर झेलून तिला वांचविली, तेंच माझें हृदय आपल्या लावण्यरूपी जहरी भाल्यानें भेदून तिनें मला मृतप्राय केलें आहे! त्या रमणीचा जर

मला लाभ होईल, तर माझ्यासारखा सुखी मीच असें मी समजेन! मला वाटतें, त्या तरुणीला मीं याच महालांत आणून सोडली. ती कोणाची कोण, तिचें नांवगांव काय, यासंबंधानें मला खरोखर कांहीं माहिती नाहीं! कदाचित् तुह्मी आणि ती एकच असाल!

**तारा**—मी आतां आपणाला संशयांत नाहीं ठेवीत! दौलतराव! ती स्त्री मी नव्हें; परंतु ती माझी जिवलग मैत्रीण आहे. ती इथल्या एका मोठ्या खानदानीच्या घराण्यांतली आहे. तिचंहि मन आपल्यावर जडलं आहे. तिच्याबरोबर तिच्या मामानं तिला दिलेला वीसपंचवीस हजारांचा विषयहि आपणाला मिळेल. फक्त आपली कबुली मात्र पाहिजे!

**दौलतराव**—वहावा! अशी दोन्ही रूपानें लक्ष्मी घरीं चालून येत असतां दरवाजा लावून घेण्याइतका मूर्ख कोण आहे? पण सुंदरी! तूं नव्हेस का ती?

**तारा**—दौलतराव! पुनः एकदा तुह्माला मी निक्षून सांगत्यें कीं, ती मी नव्हें! कांहीं गुप्त कारणाकरितां हा विवाह आजच्या आजच उरकून घेतला पाहिजे. सुदैवानं आज संध्याकाळीं मुहूर्तहि आहे. वसंतबागेच्या धबधब्याच्या जवळच्या कोपऱ्यांत सूर्यास्ताच्या पूर्वी थोडा वेळ तुह्मी या. तिथं तुह्मांला हातांत पांढरा रुमाल घेतलेली एक स्त्री दिसेल. ती तुह्माला ओळखते—ती तुह्माला बागेच्या जवळच त्रिविक्रम दीक्षित नांवाच्या एका भिक्षुकाकडे घेऊन जाईल. तिथं आपली हृदयस्वामिनी आपली अगदीं वाट पहात बसली असेल. त्रिविक्रम दीक्षित तिच्या मामाचे उपाध्ये आहेत. त्यांच्यावर विश्वास टाकायला हरकत नाहीं. आपल्या विवाहाची सर्व तयारी जय्यत असेल. मात्र हें सारं अगदीं गुप्तपणानं झालं पाहिजे, बरं का!

**दौलतराव**—ठीक आहे. अगदीं बिलकुल न चुकतां आपल्या ह्मणण्याप्रमाणें करतों.

( गुलाब घाईनें येऊन तारेच्या कानांत कांहीं सांगते. )

**तारा**—( गुलाबला एकीकडे ) काय ह्मणत्येस? झुंजारराव येताहेत? अगबाई! आतां करूं तरी काय? आतां काय अनर्थ होईल कुणाला ठाऊक!

**दौलतराव**—अशा घाबरल्यासारख्या कां दिसतां तुह्मी?

**तारा**—दौलतराव! माझे बाबा इकडे येताहेत, त्यांनीं जर आपल्याला इथं पाहिलं, तर माझा सर्वस्वी घात झाला समजा!

**दौलतराव**—अरे बापरे ! आतां लपवा मला कुठें तरी झटकन् ! जाऊं का असा मी या बाजूनें ?

**तारा**—हां हां, तिकडे नका जाऊं—फिरा मागं—ते त्याच बाजूनं येताहेत. ( स्वगत ) आतां कसं तरी करावं ? यांची गांठ तर पडतां कामा नये ! (उघड) दौलतराव ! चला जा, समोरच्या खोलींत ! करा जलदी !

**दौलतराव**—हा गेलों पहा ! पण सुटका तरी लवकर होईल ना ?

**तारा**—आपण आंत आहां हें मात्र कशानंहि दाखवूं नका ! हं–आतां मघांशीं सांगितलेला घाट नीटपणं पार पडून आपली प्रिया जर आपल्याला मिळावी अशी आपली इच्छा असली तर हूं कीं चूं न करतां आंत अगदीं स्वस्थपणं पडून रहा.

**दौलतराव**—त्याविषयीं तुह्मी अगदीं निष्काळजी रहा !

[ जातो.

[ झुंजारराव येतो. ]

**झुंजारराव**—( स्वगत ) इतका वेळपर्यंत हा गाढवाचा लेक हिरोजी कुठें गेला आहे कुणाला ठाऊक ! असो. पण तारा घरींच आहे. अहाहा ! हिच्या सुरस, कोमल मुखकांतीमध्यें उदासीनतेचें थोडेंसें मिश्रण झालें आहे, तरीहि माझ्या नेत्रांला हिचें मुखमंडल ह्मणजे सौंदर्याचें केवळ सारच दिसतें आहे ! झाल्या अपराधाबद्दल हिची क्षमा मागून पुनः हिची मर्जी सुप्रसन्न करून घेतली पाहिजे. नाहीं तर–हिच्या कायमच्या वियोगाचा—नकोच तो विचार ! —तारे ! मी इथें आल्यानें तुला संताप आला असें तुझी मुद्राच सांगते आहे !

**तारा**—आज रंभाजीरावांकडे आपण जे कांहीं गुण पाघळले, ते मीं प्रत्यक्ष पाहिले असतां, पुन्हा माझ्यासमोर उजळ माथ्यानं यायचं जेव्हां धारिष्ट केलंत, तेव्हां मला संताप येऊं नये, तर काय व्हावं ?

**झुंजारराव**—उजळ माथ्यानें यायचें धारिष्ट ! तारे ! माझा हा सुखभाव ह्मण ! काल इथें जो प्रकार मीं प्रत्यक्ष पाहिला, तो पाहूनसुद्धां मी परत इथें आलों, याला कारण माझा निलाजरेपणा कीं माझा सुखभाव याचा तूंच विचार कर ! मी तुझ्याशीं बेमान झालों नाहीं, तुझें मन माझ्याविषयीं उगीच कलुषित झालें आहे हें तुला दाखवावें—प्रत्यक्ष पुराव्यानें इथें तुझेसमोर सिद्ध करून द्यावें, या हेतूनें मी आतां इथें आलों आहें. हा झुंजारराव कदाचित्

संशयी स्वभावाचा असेल; परंतु कुपथगामी, असत्य भाषण किंवा वर्तन करणारा खास खास नाहीं! तारे! कालच्या संशयाचें अझून तुझेकडून योग्य निरसन झालें नसतांहि मी इथें आलों, या एका गोष्टीवरूनच तूं माझ्यापेक्षां प्रेमांत निःसंशय कमी ठरलेस! तुझ्या गुलाबला मला फक्त एक प्रश्न विचारूं दे!— रंभाजीरावांच्या घरीं तूं जी स्त्री कपाटांत लपलेली पाहिलीस ती तुझी गुलाब होती, असें हिरोजीनें मला शपथपूर्वक सांगितलें! विचार पाहिजे तर तिला!

**गुलाब**—होय ताईसाहेब! मीच ती! मला आतां कबूल करणं भागच आहे. क्षमा करा ताईसाहेब, मला!

**तारा**—अवदसे! तर मग मला हें अगोदर सांगायला तुला काय झालं होतं? तुझं काय काम होतं तिथं?

**झुंजारराव**—अशी रागावूं नकोस तिच्यावर! हिरोजीनें आणि गुलाबनें माझें आणि तुझें अनुकरण चालविलें आहे, असें दिसतें!

**गुलाब**—होय ताईसाहेब! मोठ्या लोकांप्रमाणंच आम्हांला वागलं पाहिजे!

**झुंजारराव**—मग माझ्या वर्तनांत कुठें कांहींच गैरशिस्त नव्हतें, असें ठरतें तर?

**तारा**—झुंजारराव! आतां तुमची अन् माझी ताटातूट व्हायची आहे, तेव्हां तुमचं वर्तन बरोबर असलं काय अन् नसलं काय सारखंच!

**झुंजारराव**—तारे! तूं इतक्या शांतपणानें आणि बेपर्वाईनें बोलते आहेस, कीं, आपल्या ताटातुटीचें तुला कांहींच वाटत नाहींसें दिसतें. पण तुझें हें भाषण आणि वर्तन माझें अंतःकरण कसें पिळून काढित आहे याची तुला कल्पना तरी आहे का? तारे! तुझ्यावर माझें प्रेम कसें आहे हें तूं विसरलीस का?

**तारा**—कशी बरं विसरेन? आपल्या प्रेमाचं मला विस्मरण पडतं, तर फार चांगलं झालं असतं; तसं होतं, तर बाबांच्या आज्ञेप्रमाणं वागतांना मागं आपल्या प्रेमाचा पाश तरी राहिला नसता! खरंच, माझा राग मला विसरून गेलं पाहिजे!—पण ही गुलाब–

**झुंजारराव**—तारे! गुलाबला तूं क्षमा कर. (स्वगत) काय? 'क्षमा कर' असें मीं म्हटलें? चुकलों–क्षमा कर असें हक्कानें हिला सांगायला आतां मला अधिकार काय राहिला? (उघड) पण खरें म्हटलें, तर तुझ्या गुलाबमुळें त्रास सोसावा लागला मलाच!

**तारा**—आपणा स्वतःचं नुकसान करणारापेक्षां ज्यावर आपलं विशेष प्रकारचं प्रेम असतं त्याचं नुकसान करणाराला क्षमा करणं अगदीं जिवावर येतं. पण आपण सांगतां आहां तेव्हां गुलाबला क्षमा करणं मला भागच आहे! गुलाब जा! बाबांवर नजर ठेव. ते इकडे येताहेत असं वाटतांच अगोदर धावत येऊन मला सांग.

**गुलाब**—आज्ञा ताईसाहेब!

[ जाते.

**झुंजारराव**—तारे! तुला मी आतां एकच प्रश्न विचारतों. माझ्यावर तुझें निष्कलंक प्रेम आहे ना?

**तारा**—आपल्या या प्रश्नाचं उत्तर माझ्या तोंडूनच वदविण्यांत काय बरं अधिक आहे? आपलं मनच नाहीं का या प्रश्नाचं उत्तर देणार?

**झुंजारराव**—खरोखर, आज मी धन्य झालों! अहाहा! प्रेमरसाचा ज्याला अनुभव आहे, त्यालाच त्याचं माहात्म्य समजणार! प्रणयिजनांच्या कलहानंतर त्यांच्यामधील प्रणयाची मधुरता किती तरी पटीनें वाढते, हें अगदीं खरें आहे. तारे! तुझ्यासारख्या रमणीच्या एका प्रेमपूर्ण मुद्रेंत काय विलक्षण जादू असते, याचा आज मला पूर्ण प्रत्यय आला. ब्रह्मदेवानें तुह्मां स्त्रियांनां किती विलक्षण शक्ति देऊन ठेवलेली आहे पहा! खवळलेल्या प्रणयि पुरुषाचा क्रोधाग्नि एका मृदु शब्दानें तुह्मी शांत करतां! उदकांत अग्नीला शमविण्याची अशी विलक्षण शक्ति खास नाहीं! आपल्या प्रतापी शस्त्रास्त्रांनीं अनेक शत्रूंचा निःपात करून सर्व जग आपल्या ताब्यांत ठेवणाऱ्या पुरुषाचें हृदय तुह्मी स्त्रिया आपल्या नेत्ररूपी भाल्याच्या एका फेंकीनेंच काबीज करून आपल्या ताब्यांत ठेवतां! भयंकर संकटें सोसूनहि प्रतापी शत्रूला आपण कधींहि शरण गेलों नाहीं अशी घमेंड मारणाऱ्या पुरुषांनां केवळ आपल्या अबोल्यानेंच आपल्या पायांशीं लोटांगणें घालवित शरण आणतां! तारे! कालचा तो घोटाळा! माझ्या मनांतून तो कांहीं केल्या जात नाहीं! एक तेवढा माझा संशय नाहींसा केलास तर-तारे—

**तारा**—शांतपणानं थोडा वेळ धीर धरा! अगदीं थोड्या अवकाशांत या साऱ्या घोटाळ्याचा उलगडा होऊन आपलं पूर्ण समाधान होईल!

**झुंजारराव**—तुझ्या ह्मणण्याप्रमाणें मी करण्यास कबूल आहें. पण या अटीवर, कीं, तुझ्या बापाच्या ह्मणण्याप्रमाणें करण्याचा तूं विचारहि मनांत

आणतां कामा नये ! असें करण्याचें जर तूं मला वचन देत असलीस, तर या गूढ रहस्याचा उलगडा होईतोंपर्यंत मी कसा तरी दम धरीन !

**तारा**—( हंसत ) आह्मां बहुतेक स्त्रियांत, निदान या वयांत तरी, धर्मावर प्रेमाचाच नेहमीं जय होत असतो !

[ गुलाब घाईनें येते. ]

**गुलाब**—ताईसाहेब ! ताईसाहेब ! बाबासाहेब आतांच कशालासे बागेंत गेले होते. बागेचं मागचं दार उघडं पाहून ते फार रागावले अन् स्वतः त्यांनीं तें बंद करून त्याला कुलूप घातलं अन् स्वारी बडबडत इकडेच येत आहे !

**तारा**—अगबाई ! सांपडलों तर आह्मी ! आतां काय करावं ? आपला आतां सर्वस्वी घात झाला !

**झुंजारराव**—मी कुठें गेलों तरी दुर्दैव कांहीं माझी पाठ सोडित नाहीं ! संभाजीराव इथून जात तोंपर्यंत या खोलींत तरी लपून बसतों ! ( दौलतराव असलेल्या खोलीजवळ जाऊन किंचित् दार उघडतो. )

**तारा**—(स्वगत) अगबाई ! हा दुसरा घोटाळा ! आतां दौलतराव यांच्या दृष्टीस पडल्याखेरीज रहात नाहींत !—तिकडे जाऊं नका गडे ! ती जागा कांहीं सुरक्षित नाहीं. बाबा तिथं नेहमीं जातात.

**झुंजारराव**—( स्वगत ) माझ्या डोळ्यांनीं मला फसविलें तरी एक किंवा मीं त्या खोलींत कोणी तरी पुरुष पाहिला खास ! बोलण्याची ही वेळ नव्हे ! त्याच्यावर आपणाला नीट नजर ठेवली पाहिजे !

**गुलाब**—शाबास ! काय नामी युक्ति सुचली मला या वेळीं ! ताईसाहेब ! आपण घाबरूं नका ! यांनां इथून नीटपणं काढून न्यायची मी सर्व व्यवस्था करतें. आपण कांहीं काळजी करूं नका ! मी आत्तां येतें.

[ जाते.

**झुंजारराव**—( स्वगत ) आतां पाहूं बरें त्याला माझ्या नकळत कशी काढून नेतेस ती सटवे ! आतां हा सूर्य अन् हा जयद्रथ असें दाखवून देऊन तुझ्या पदरांत पुराव्याचें पक्कें माप घालतों !

[ गुलाब एक थोरली दुलई घेऊन येते. ]

**गुलाब**—हं रावसाहेब ! ही घ्या डोकीवरून नीट गुरफटून. मुळींसुद्धां अंग बाहेर दिसूं देऊं नका !

**झुंजारराव**—चल चल आण लवकर ! संभाजीरावांनां फसवायला काय सांगशील तें करतों ! ( गुलाब झुंजाररावाला दुलईनें नीट झांकते.)

**तारा**—आटोप लवकर गुलाब ! आत्तां येतील बाबा. पुढं काय करणार तूं?

**गुलाब**—त्याची नको आपणाला काळजी ! बाबासाहेब भोळे सांब आहेत. त्यांनां फसवायला कितीसा वेळ ? रावसाहेब ! तोंडांतून एक शब्द दिखील काढूं नका बरं ! नाहीं तर फसवाल सगळं !

**झुंजारराव**—अगदीं एक चकार शब्द नाहीं काढीत ! ( स्वगत ) त्या चांडाळणीपेक्षां तुझ्यावरच मला जास्त लक्ष्य ठेवलें पाहिंजे !

[ संभाजीराव येतो. ]

**संभाजीराव**—तारे ! काय अंधाधुंदी ही पोरी ! आतां बागेंत जाऊन पाहिलें तों मागचा दरवाजा आपला सताड उघडा !—अरे पण हें काय ?

**गुलाब**—ही माझी मावशी सरकार ! कालच ही इथं आली आहे. ताई-साहेबांनां भेटायला हिला मीं इथं आणली.

**संभाजीराव**—काय ह्मणतेस, ही तुझी मावशी ? हीं पूर्वीचीं माणसें पहा—हीं किती उंच अन् धिप्पाड अन् तूं तिची भाची हिच्या मानानें किती खुजी ! बाई ! तुमचें नांव काय ?—

**गुलाब**—तिला कांहीं ऐकूं येत नाहीं सरकार ! ती बहिरी आहे. जन्मा-पासून कांहीं ही बहिरी नव्हती. नुकती अलीकडे पांचसात वर्षं बहिरी झाली आहे ! हिचं नांव मैना मावशी !

**संभाजीराव**—अरेरे ! मनुष्याचे कान गेले ह्मणजे फार वाईट ! पण ही दुलई कशाला हिच्याभोंवती गुंडाळली आहे ? आहे काय सोंग हें ?

**तारा**—नको ग नको ! बाबा—

**गुलाब**—सरकार ! माफ करा ! मावशीच्या डोळ्यावरनं जर हें पांघरूण काढलं, तर तिच्या डोळ्यांनां प्रकाशामुळं फार यातना होतात. ह्मणून दिवसा हिच्या डोळ्यांवरलं पांघरूण काढतां येत नाहीं.

**संभाजीराव**—ह्मणजे ? असें कां ? हिचे डोळे तर नीट शाबूत आहेत ना ?

**गुलाब**—नाहीं सरकार ! सुमारें सहा महिन्यांपूर्वीं हिला भयंकर देवी आल्या होत्या. ईश्वराच्या दयेनं ही त्यांतून वांचली; परंतु हिच्या दृष्टीला तेव्हांपासून कांहीं विकार सुरू होऊन ती हलुहलू कमी होऊं लागली.

हा विकार जाण्यासाठीं पुष्कळ घरगुती उपाय करून पाहिले; अंगारे धुपारे झाले; पण कशानंच गुण येईना! नुकतंच एका नाकाडोळ्याच्या वैद्यानं हिला एक या विकारावर उपाय सांगितला. त्या मेल्या डोळेफोड्यावर भरंवसा ठेवून या बिचारीनं तो करून पाहिला. झालं! थोडंबहुत हिला दिसत होतं, पण तो उपाय केल्याबरोबर हिचे डोळे फुटून त्यांच्या खांचा झाल्या! इतक्यानं निभतं, तरी बरं होतं मी म्हणलें! परंतु तेव्हांपासून असं झालं आहे कीं, कसला प्रकाश म्हणून हिला सहन होत नाहीं! हिच्या डोळ्यांवर जर थोडा प्रकाश पडला तर ही इतकी घाबरी होते, कीं, जगते का मरते अशी हिची स्थिति होते. म्हणून हिला नेहमीं जाड अशा पांघरुणांत गुरफटून ठेवावी लागते. दिवसा तें पांघरूण काढण्याची कांहीं सोय नाहीं. यावर कांहीं औषधोपचार झाला तर पहावा म्हणून मीं हिला इथं आणली आहे.

**संभाजीराव**—अरेरे! गरीब बिचारी! गुलाब! हिच्या औषधपाण्याची नीट व्यवस्था कर. तूर्त खर्चासाठीं घे हे पांच रुपये! ( देतो. )

**गुलाब**—(स्वगत) मदनमहाराजांचं काम करणारांचे श्रम फुकट जात नाहींत असं जें मी म्हणलें, त्याचं आणखी हें एक प्रत्यंतर! कालपासून माझ्यावर बक्षिसांचा सारखा वर्षाव होतो आहे! या बाबासाहेबांसारखीं भोळीं माणसं या जगांत आहेत, म्हणून आमच्यासारख्या मंडळीचा कांहीं निभाव लागतो आहे! (उघड) बरं ताईसाहेब! आतां जातों आम्ही! माझ्या विनंतीला मान देऊन माझ्या या खेडवळ मावशीची आपण भेट घेतली अन् तिला चांगली मदतहि केलीत, हे आम्हां गरिबांवर आपले फार उपकार आहेत!

**तारा**—बरं, जा तूं आतां! तुझ्या मावशीला पोंचवून लवकर ये.

**गुलाब**—( मोठ्यानें ओरडून ) मैना मावशी! चल आतां घरीं! ( संभाजीरावांकडे पहात ) आणखी ओरडल्यें तरी हिला ऐकायला थोडंच येणार आहे!

**संभाजीराव**—नीट संभाळून ने बरें तिला!

**तारा**—( स्वगत ) सुटल्यें बाई एकदाची मी! म्हटलं, कसं हें निभावतं एकदाचं कोण जाणे! गेले ते पार पडून!

**संभाजीराव**—तारे, ऐकलीस का तूं ही बातमी?

**तारा**—कसली बातमी बाबा?

**संभाजीराव**—रंभाजीरावांचा दगड्या मला सांगत होता, कीं, हैबतरावांची मुलगी चंपा ह्मणे घरांतून पळून गेली! खरेंच तारे! त्या बिचाऱ्या हैबतरावांच्या नशिबीं त्यांच्या दोन्ही पोरांपासून कांहीं सुख नाहीं!

**तारा**—काय! चंपा घरांतून पळून गेली? अगबाई! खरं कीं काय? मी हें आतां तुमच्या तोंडून ऐकलें आहें! बाबा! कां बरं ती पळून गेली? तुह्माला कांहीं समजलं आहे?

**संभाजीराव**—तसें चांगलेंसें कांहीं मला समजलें नाहीं. पण हैबतराव ह्मणे तिला त्या आनंदराव मोहिल्यांला देणार होते. चंपेला कांहीं असला नवरा आवडेना, अन् हैबतराव कांहीं आपला हट्ट सोडीनात. तेव्हां हें लग्न चुकविण्याकरतां चंपा घरांतून पळून गेली, असें ह्मणतात!. (स्वगत) खरोखर, एका अर्थी मी फार सुखी आहें. बाबांच्या आज्ञेप्रमाणें माझ्या तारेचा मीं देवाशीं विवाह करून टाकायचा बेत केल्यामुळें अमुक ह्मातारा नवरा अन् तमुक तरुण नवरा, अमुक पोरीला आवडत नाहीं अन् तमुक आवडतो, असा कांहीं माझ्यामागें त्रास नाहीं आणि माझ्या ह्मणण्याला पोरगीहि मान्य झाल्यामुळें आमच्या घरीं आपुकमापुकांचा धुडगूसहि नाहीं. मला मोठी काळजी होती कीं, तारा माझ्या ह्मणण्याला कबूल होते कीं नाहीं! कारण, आमच्या बाबांचा जो बेत अगोदर मलाहि फारसा पसंत नव्हता तो तिला कसा पसंत व्हावा? पण नाहीं, माझी पोरगी मोठी आज्ञाधारक अन् शहाणी आहे. तिला मीं विचारतांच माझी गुणांची पोर माझ्या ह्मणण्याला तेव्हांच कबूल झाली. तेव्हांपासून माझी एक मोठी थोरली काळजी गेली. आतां एखादे वेळीं वाटतें कीं, आपण एकुलत्या एक पोरीच्या साऱ्या सुखाची धुळधाणी करित आहों—पण नको–तो विचारच नको आतां! एकदा निश्चय झाला तो कायम! आतां तो अमलांत मात्र लवकर आणला पाहिजे.

**तारा**—मला त्या बिचारीची कींव येते! तिनं आपल्या बापाची आज्ञा मोडायची नव्हती!

**संभाजीराव**—अगदीं योग्य बोललीस! तुझ्यासारखी आज्ञाधारक मुलगी असेंच ह्मणणार! तारे! तुझ्या लग्नाचं मी आतां लवकरच मनावर घेणार आहें.

**तारा**—(स्वगत) पण तुमच्या अगोदर मींच तें मनावर घेतलं आहे! माझ्या खऱ्या कल्याणाकरतां आणि एकुलत्या एक मुलीच्या सौख्याचा नाश

केल्याबद्दल पुढं तुह्माला पश्चात्ताप होऊं नये ह्मणून मला माझं करणंच योग्य वाटतं !

[ गुलाब येते. ]

**संभाजीराव**—तारे ! खरेंच सांगतों. तुझ्यासारखी भाग्यवान् तूंच ! मनुष्यप्राण्यांतील कुणा एखाद्या क्षुल्लक पुरुषाशीं तुझें लग्न होऊन जें सौख्य तुला मिळेल, त्याच्या शेंकडोंपट सुख तुला देवाशीं लग्न लागल्यानें मिळेल हें उघड आहे ! धर्मश्रद्धेपासून व भगवंताच्या सेवेपासून तुला किती शांति, किती सौख्य मिळेल, याची तुला किंवा मला आतां कल्पनाहि करतां येणार नाहीं. धर्मश्रद्धेचें माहात्म्य आमच्या अनुभविक पूर्वजांनीं सांगितलें आहे, तें उगीच नाहीं ! आपल्या पतिव्रता स्त्रियांना पदोपदीं छळणारे, आपल्या वाईट वर्तनानें त्यांना झुरवून झुरवून मारणारे, व्यसनी, उधळे असे नवरे आपणाला किती बरें आढळून येतात ? अशा नवऱ्यांचा छळ असह्य होऊन अनेक बायका विहिरींत उड्या टाकून त्या छळापासून मुक्त होतात, हेंहि आपण पहातों. अशा कसायांच्या हातांत आपण होऊन आपली मान देण्यापेक्षां त्या भगवंताच्या सेवेंत आपल्या आयुष्याचा व्यय करणें श्रेयस्कर नाहीं का ?

**गुलाब**—सरकार ! बोललें याची क्षमा असावी ! मला वाटतं, आपल्या इच्छेप्रमाणं ताईसाहेब चालल्या तर त्यांच्या जन्माच्या सुखाची जी माती होईल, त्यापेक्षां अशा कसायांच्याहि हातांत मान देणं कांहीं फारसं वाईट नाहीं ! शिवाय, सारं जग अशा दुष्ट लोकांनींच भरलं आहे असं आपणाला वाटतं का ? ताईसाहेबांच्या जागीं मी असलें, तर माझ्या बापाचा असला तऱ्हेवाईक जुलूम खास चालूं दिला नसता !

**संभाजीराव**—मोठी शहाणीच कीं नाहीं तूं ! तूं काय केलें असतेंस ?

**गुलाब**—पहिल्यानें मीं त्याची परोपरीनं विनंति करून पाहिली असती, अन् शेवटीं त्याला असं खडसून सांगितलं असतं कीं, दुसऱ्याच्या सांगण्यावरून तिसऱ्याच्या जन्माची धुळधाणी करायला तुला बिलकुल अधिकार नसल्यामुळं मी तुझी आज्ञा साफ मानित नाहीं !

**संभाजीराव**—( स्वगत ) हिचें ह्मणणें अगदीं खरें आहे. बाबांनीं काय वाटेल तें मला सांगितलें, तरी माझ्या मुलीच्या जन्माची अशी माती करायला, खरें ह्मटलें तर मला काय बरें अधिकार आहे ? फार तर माझ्यापुरतें वाटेल तें वचन मला बाबांना देतां आलें असतें. पण—पण तें कांहीं नाहीं. आतां

तो विचार नाहीं उपयोगी! ( उघड ) आहेसच तूं तशी मोठी शहाणी ! आड-दांडपणा ह्मणजे तुह्मा दासींचें बाळकडू आणि त्याच्याबरोबर असत्य आणि लुच्चेगिरी हींहि औषधें लहानपणापासून तुमच्या ठिकाणीं मुरलेलीं असतात. मी जर तुझा बाप असतों, तर अशा प्रकारचा बुद्धिवाद तूं मला शिकवायला लागतांच तुझे अधिकारबिधिकार चटसारे गुंडाळून ठेवून तुला असा चोप दिला असता कीं, महिनाभर तुला अंथरुणावरून हालवतें ना ! माझी तारा तशीच आज्ञाधारक आहे ह्मणून बरें आहे. नाहीं तर तूं तिला केव्हांच बिघडवून टाकली असतीस !

**तारा**—गुलाब ! तूं तरी पुरी दुतोंडी आहेस ग ! कालच ना तूं मला ह्मणालीस, कीं, बाबासाहेबांचा बेत आपणाला फार योग्य वाटतो ह्मणून ? अन् आतां असं ह्मणत्येस ? बाबांजवळ असं अमर्यादपणं बोलायला तुला लाज नाहीं वाटत ?

**गुलाब**—असं मीं ह्मटलं असलं तर मीं अगदीं खोटं बोलल्यें !

**संभाजीराव**—या दासी अशाच दोन तोंडांच्या असायच्या ! हो, बरी आठवण झाली ! तारे, तुझ्या लग्नाचा विचार मला आतां अगदीं लवकर ह्मणजे चारसहा दिवसांच्या आंतच केला पाहिजे. कारण, काल रात्रीं बाबांनीं माझ्या स्वप्नांत पुनः येऊन मला माझ्या वचनाची आठवण दिली !

**तारा**—( स्वगत ) आतां चारसहा दिवस तरी कशाला पाहिजेत ? ( उघड ) आपणाला ज्यांत सुख होईल, तेंच करण्यांत मला आनंद आहे ! हो, कधीं तरी लग्न हें करायचंच, मग पंधरा दिवसांनीं काय अन् आज काय ?

**गुलाब**—( स्वगत ) भोळा बिचारा ह्मातारा ! ताईसाहेब ह्मणतात तें लग्न अन् बाबासाहेबांच्या मनांतलं लग्न हीं मात्र अगदीं निराळीं, एवढंच काय तें !

**संभाजीराव**—तारे ! कांहीं जरुरीच्या कामानिमित्त आज मी कांचन-पुरास माझ्या एका स्नेह्याकडे जातों आहें. तीनचार दिवसांनीं परत येईन. तिकडून आल्याबरोबर तुझ्या लग्नाच्या विचारास लागलें पाहिजे. मी परत येईपर्यंत नीट हुषारीनें रहा.

**तारा**—ठीक आहे बाबा ! मागली तुह्मी कांहीं काळजी करूं नका. पण लवकर या हं !

[ संभाजीराव जातो व त्याला पोंचवित तारा जाते.

**गुलाब**—चला, आतां या बंदिवान् पोपटाचा समाचार घेतला पाहिजे ! दौलतराव ! दौलतराव ! चला, या बाहेर जलदी.



**संभाजीराव**—पण ही दुलई कशाला हिच्याभोंवती गुंडाळली आहे ? आहे काय सोंग हें ? ( पृष्ठ ९२. )

[ दौलतराव येतो. ]

**दौलतराव**—काय ? झालें जिकडे तिकडे चक ? कोणी नाहीं ना कुठें ?

**गुलाब**—कुणी नाहीं ! पण तुह्मी आलांत तो रस्ता आतां बंद आहे, ह्मणून तुह्माला बागेच्या भिंतीवर युक्तीनं चढून रस्त्यांत उडी टाकून गेलं पाहिजे. त्याशिवाय इलाज नाहीं. चला या. ( स्वगत ) झुंजारराव गेले त्या रस्त्यानं यांनां नेऊन उपयोग नाहीं.

**दौलतराव**—तूं सांगशील तसें करतों. चल.

[ दौलतराव व गुलाब जातात.

[ झुंजारराव येतो. ]

**झुंजारराव**—तो ह्यातारा पार होईपर्यंत बाहेरच्या त्या जिन्याखालीं होतों लपून ! ह्मटलें, थेरडा किती वेळ रहातो आहे कुणाला ठाऊक ? पण गेली एकदाची पीडा लवकर ! ( ऐकून ) अरे बापरे ! कुणी तरी येतें आहे वाटतें ! आतां मात्र सांपडलों खास ! पण पहावा प्रयत्न करून एकदा. या कोचाखालीं लपूं या. बहुधा ताराच असेल ही ! दुसरें कुणी असलें तर मात्र आमचीं शंभर वर्षें भरलीं ! ( लपतो. )

[ तारा येते. ]

**तारा**—आतां दौलतरावांनां काढून लावूं या ! आज त्यांनां चांगलाच कैदखाना भोगावा लागला. ( दौलतराव लपलेल्या खोलीशीं जाऊन ) चला आतां या बाहेर ! कुणी कुठं नाहीं.

[ झुंजारराव कोचाखालून हळूच येतो.

**झुंजारराव**—पण मी आहें ना ? बोल ! पकडली कीं नाहीं तुला ? विश्वासघातकी, गळेकापू, नीच, कुलटा !

**तारा**—( स्वगत ) अगबाई ! झुंजारराव इथं ! आतां मात्र निःसंशय घात घाला !

**झुंजारराव**—नीचा ! तूं कोणीहि ऐस. चल ये असा पुढें. तुझ्या प्रियकरणीच्या डोळ्यांदेखत तुह्मा दोघांच्या पापकर्माचा पुरावा दाखवून मी तुला इथल्या इथें ठार केल्याखेरीज रहात नाहीं ! माझ्या मागें तूं या जारिणीसह अनेक सुखाचे दिवस काढले असशील, पण आज तुझ्या पापाचा घडा पूर्ण भरला असें समज ! माझ्या हातून आज तुला कोण सोडवतो

तो पाहूं या! अरे अरे! पण घात झाला. त्या जिन्याखालीं मी तरवार विसरलों. डोळ्याचें पातें लवतें न लवतें तों ती घेऊन येतों पहा.

[ धावत जातो.

**तारा**—आतां काय करूं ? अगदीं निर्वाणीचा प्रसंग आला. आतां चंपाताईला उघडकीस आणली नाहीं तर इथं खून पडल्याशिवाय खास रहात नाहीं !

[ गुलाब येते. ]

**गुलाब**—ताईसाहेब ! दौलतरावांनां मीं मघांशींच इथून पार काढून नेलं !

**तारा**—गेले का ते ? ठीक झालं बाई ! आतां कांहीं हरकत नाहीं.

[ झुंजारराव येतो. ]

**झुंजारराव**—काय ! पळविलास इतक्यांत तुझ्या दोस्ताला ? पण इतक्यांत इथून तो कुठें जाणें शक्यच नाहीं ! अरे, आहे काय चमत्कार हा ?

**तारा**—कोण ते दोस्त ? अहो खदिरांगार जमदग्नि महाराज ! कोण ते दोस्त ? हः हः ! तुमच्या डोक्यांतून संशय ह्मणून कधीं जायचा नाहीं ना ?

**झुंजारराव**—( स्वगत ) अरे ! हिनें माझी परीक्षा तर नाहीं ना पाहिली ? तारे ! काय माझा छळ मांडला आहेस हा ?

**तारा**—आपणच व्यर्थ संशय घेऊन आपला छळ करून घेत आहां ! आपण इथं लपून बसलां तें माझ्या लक्ष्यांत आलं, अन् ह्मणूनच आपली परीक्षा पहाण्याकरतांच मुद्दाम मीं ही युक्ति योजली ! आपण या परीक्षेंत छान उतरलांत !

**झुंजारराव**—तारे ! खरोखर थट्टाच का ही ?

**तारा**—मला वाटलंच कीं, माझी युक्ति सफल होऊन आपणाला संशय येणार आणि नेहमींप्रमाणं आपण डोकींत राख घालणार! आपला संशयाग्नि किती लवकर पेटतो हा ! खरंच, अशा आपल्या या संशयी स्वभावामुळं आपल्या संगतींत माझं आयुष्य फारच सुखानं जाईल !

**झुंजारराव**—तर मग फक्त माझी परीक्षा पहाण्यासाठींच केलेंस तूं हें ?

**तारा**—आपल्या डोळ्यांवर आपला विश्वास नाहीं ?

**झुंजारराव**—माझ्या डोळ्यांवर माझा विश्वास नाहीं, कानांवर नाहीं, कल्पनेवर नाहीं, कशावर नाहीं ! त्या सर्वांनीं मला फसविलें आहे. धर्मांत जशी अंधश्रद्धा लागते, तशीच प्रेमसंबंधांतहि लागते, हें मला आतां चांगलें

करून आलें. पुरुषानें एकदा आपलें मन आपल्या रमणीच्या ताब्यांत दिलें, ह्मणजे ती सांगेल तसें त्याला पहावें लागतें आणि ऐकावें लागतें. त्याला निराळी दृष्टि किंवा श्रवणशक्तिच नसते !

**तारा**—या ह्मणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. स्त्रियांचंहि असंच आहे. पण यांत नवल तें काय मी ह्मणतें ? इंद्रियांचं चालक मनच दुसऱ्याच्या ताब्यांत गेल्यावर तीं इंद्रियंहि पराधीन होणारच !

**झुंजारराव**—तारे! आपण अझून विवाहाच्या दृढपाशानें बांधलों गेलों नसल्यामुळें हीं आगंतुक संकटें येतात असें मला वाटतें. मला तूं कायमचा सुखी कधीं करणार ?

**तारा**—मी याविषयीं आपणाला उद्यां नक्की सांगेन. आज बाबा कांचन-पुरास जाण्यासाठीं आतां इतक्यांत निघणार आहेत. ते तिकडे तीनचार दिवस रहायचे आहेत. ही संधि आपला हेतु तडीस न्यायला फारच उत्तम आहे. पण कृपा करून आपण आतां जा. बाबा कदाचित् निघतांना इकडे येण्याचा संभव आहे.

**झुंजारराव**—उद्यां मी धन्य होणार ! सूर्यनारायणा ! असा रेंगाळूं नकोस ! लवकर अस्ताला जाऊन मला अत्यंत सुखदायक असा उद्यांचा दिवस आपल्याबरोबर लवकर घेऊन ये ! पण तारे ! मला आतां गेलेंच पाहिजे का ?

**तारा**—होय ! जन्मांत पुनः कधींहि ताटातूट न होण्याजोगी आपली आतां लवकरच भेट होईल. तोंपर्यंत कसं तरी करून धीर धरा.

**झुंजारराव**—अहाहा ! प्रिये तारे ! तुझ्या अमृतमय शब्दांमुळें माझें हृदय आनंदानें अगदीं तुडुंब भरून गेलें आहे ! आतां त्यांत संशयास किंवा किल्मिषाला यत्किंचितहि जागा नाहीं. माझ्याप्रमाणें तूंहि आपल्या मनांतून मजबद्दल अल्पस्वल्प संशय असल्यास तो काढून टाक. परमेश्वरा ! अतःपर आह्मा उभयतांच्या मनांत एकमेकांविषयीं निर्मल प्रेम आणि पूर्ण विश्वास राहो !

[ पडदा पडतो. ]

# अंक पाचवा.

## प्रवेश पहिला

[ स्थल–रंभाजीरावाचें घर. झुंजारराव व रंभाजीराव बोलत बसले आहेत, असा प्रवेश. ]

**झुंजारराव**—रंभाजीराव! किती आनंदाचा दिवस हा! तारेसंबंधीं काल मला जो संशय आला होता, तो नाहींसा होऊन आमचा कलह तिचें माझें प्रेम वाढावयास मात्र कारण झाला! आणि मुरारराव खरोखरीच बरा होऊन मी मोठ्या संकटांतून वांचलों, असें तूं सांगतोस!

**रंभाजीराव**—झुंजारराव! या दोन्ही गोष्टींमुळें या तुझ्या हितचिंतक मित्राला तुझ्या दुप्पट आनंद होत आहे!

[ हिरोजी येतो. ]

**झुंजारराव**—तारा घरींच जाते काय हें पहायला तुला जो पाठविला, तो बराच लवकर आलास तूं हिरोजी!

**हिरोजी**—मला उशीर लागायला कारण तसेंच झालें सरकार! –त्या घरीं गेल्या–

**रंभाजीराव**—हें तूं नकोस काहीं सांगायला. झुंजारराव आतां तिकडूनच आला.

**हिरोजी**—सरकार! आपल्या कानांत मला कांहीं सांगायचें आहे.

**झुंजारराव**—काय सांगायचें आहे रे? ( हिरोजी झुंजाररावाच्या कानांत कांहीं सांगतो. )

**रंभाजीराव**—( स्वगत ) हिरोजीनें सांगितलेली बातमी ऐकतांच याचं तोंड असें कां बरें एकदम उतरलें?

**झुंजारराव**—दौलतराव म्हणून कुणी रंभाजीरावाच्या ओळखीचा गृहस्थ आहे, त्याचा नोकर असें तूं म्हणालास नव्हे हिरोजी? (स्वगत) अरे अरे अरे! त्या बेशरम चांडाळणीनें गोड बोलून माझ्या डोळ्यांत खास धूळ फेंकली! पण याचा पक्का सूड घेईन तरच नांवाचा झुंजारराव!–रंभाजीराव! दौलतराव म्हणून कुणी गृहस्थ तुझ्या ओळखीचे आहेत?

**रंभाजीराव**—आहेत; कां बरें?

**झुंजारराव**—नाहीं, कांहीं विशेष नाहीं. त्याच्या नोकराशीं आपली थोडी मारामारी झाली, असें हिरोजी सांगतो.

[ हिरोजी जातो.

**रंभाजीराव**—स्वतः दौलतराव फारच चांगला मनुष्य आहे. त्याची आणि माझी मूळ ओळख कारंजपुरांतील. बरेच दिवसांनीं त्याची काल अकल्पित गांठ पडली. तो मजकडेच उतरला आहे.

**झुंजारराव**—काय तुझ्याकडे उतरला आहे! मग त्याची अन् माझी अझून गांठ कशी नाहीं पडली?

**रंभाजीराव**—काल तूं तारेकडे निघून गेल्यावर बऱ्याच वेळानें तो आला. तारेकडून तूं रात्रीं आलास कसा नाहीं इकडे?

**झुंजारराव**—तारेच्या बेमानपणामुळें काल माझें मस्तक फार भडकून गेलें होतें! तें शांत करण्याकरतां काल रात्रभर मी नदीच्या कांठीं बसून होतों. सकाळच्या सुमारास इकडे आलों.

**रंभाजीराव**—अन् त्याच सुमारास दौलतराव कुठें गेला त्याचा अझून पत्ता नाहीं. यामुळेंच तुझी त्याची गांठ पडली नाहीं.

**झुंजारराव**—तो मनुष्य कसा काय आहे?

**रंभाजीराव**—दौलतराव चांगला इज्जतदार मनुष्य आहे. फार सुस्वभावी, तशीच विनोदी आणि रंगेलहि आहे खारी! त्याच्या घरच्या स्थितीविषयीं विचारित असलास, तर तीहि उत्तम आहे.

**झुंजारराव**—(स्वगत) रंगेल आहे ना? तरीच!–आमच्या चटकचांदणीची त्याच्यावर नजर गेली ती उगीच नाहीं—

**रंभाजीराव**—हा पहा तोच आला. बेट्याला शंभर वर्षें आयुष्य आहे!

[ दौलतराव येतो. ]

**रंभाजीराव**—दौलतराव! मला वाटलें कीं तूं कुठें हरवलास!

**दौलतराव**—अरे बाबा! तशाच कांहीं कारणामुळें मला इतका वेळ लागला! हे कोण बरें?

**रंभाजीराव**—हे माझे एक जिवलग स्नेही आहेत. पण असें कोणतें कारण तें तरी सांगशील?

**दौलतराव**—या तुमच्या कुंजपुरच्या स्त्रियांना नमस्कार असो बाबा! आज सकाळींच एक बुरखेवाली स्त्री मला वसंतबागेंत भेटली–तिच्याच

चिठीवरून मी तिथें गेलोंहो तों ह्मणा, पण पुढें लभ्यांश ह्मणशील तर कांहीं नाहीं! चारदोन प्रश्न मला विचारलेन् अन् गेली ती निघून झालें! पुढें थोड्याच वेळानें दुसरें असेंच एक प्रकरण माझ्याकडे आलें.

**रंभाजीराव**—काय तें?

**दौलतराव**—एका सुंदर परीशीं पुनः अशीच गांठ पडली. पण आश्चर्य हें कीं, ही स्त्रीहि बुरखा घेऊनच मला भेटली. पण ती कोण तें मात्र मला मुळींच कळलें नाहीं.

**झुंजारराव**—( स्वगत ) अरेरे! शंकाग्नीनें माझें हृदय जळतें आहे! नीच, बेमान!

**रंभाजीराव**—कां दौलतराव? मीं तुला काल सांगितलें होतें ना, कीं, तुझ्यासारख्या राजबिंड्या पुरुषावर स्त्रियांच्या उड्या पडतील ह्मणून? पण तुझ्या इच्छेप्रमाणें ती उच्च दर्जाची आणि श्रीमंत तरी आहे का?

**दौलतराव**—अरे काय विचारतोस? कुणीतरी फारच मोठ्या घराण्यांतली असली पाहिजे! तिची निजायची खोलीच किती थाटाची आहे! काय तो पलंग! अन्—महाल! काय तें वर्णन करतां येत नाहीं!

**झुंजारराव**—वहावा! बरीच लोणकढी दिलीत ठेवून! आतांच ना तुह्मीं सांगिलेंत कीं ती स्त्री कोण तें तुह्माला कळलें नाहीं ह्मणून?

**दौलतराव**—होय. अन् अझूनहि तेंच मी सांगतों. तिला प्रत्यक्ष कांहीं मीं पाहिलें नाहीं. फक्त तिचा बुरखा मात्र दृष्टीस पडला.

**झुंजारराव**—तर मग तिचा महाल, शय्यागृह, अन् पलंग यांची तुह्माला काय हो माहिती?

**रंभाजीराव**—बराच आहेस कीं रे तूं दौलतराव! सांग सगळें आतां!

**दौलतराव**—बरें तर, सांगतों सगळी पहिल्यापासून हकीगत! आज सकाळीं बसंतबागेंत भेटलेलें सावज माझ्या हातून निसटल्यापासून अगदीं थोड्याच वेळांत बुरखेवाली एक दासी माझेपाशीं येऊन मला आपल्याबरोबर येण्यास सांगूं लागली. मीहि विशेषसा विचार न करतां तिच्या मागोमाग जाऊं लागलों. त्या मदनाच्या दूतीनें पांचपन्नास वांकडीं तिकडीं वळणें घेऊन मला एका बागेंत नेलें.

**झुंजारराव**—( स्वगत ) ही तारेची बाग!

**दौलतराव**—नंतर तेथून तिनें मला एका अप्रतिम सुंदर महालांत नेलें आणि बाईसाहेब इतक्यांत येतील असें सांगून ती गेली !

**झुंजारराव**—( स्वगत ) मरो तिची ती मदनाची दूती! ही गुलाब!

**दौलतराव**—नंतर थोड्याच वेळांत एक अप्रतिम सुंदर स्त्री बुरखा घेऊन तेथें आली–येथून तेथून सारा बुरख्यांशीं कारभार ! तिचा मुखचंद्र मला कांहीं पहावयास मिळाला नाहीं. कारण, तो अवगुंठनरूपी मेघानें आच्छादित होता; परंतु तिच्या एकंदर गोंडस नाजूक बांध्यावरून, उज्ज्वल अंगकांतीवरून तिचा चेहरा अप्रतिम सुंदर असला पाहिजे, असें अनुमान कोणींहि काढलें असतें !

**झुंजारराव**—पण महाराज ! तिचें शय्यागृह आपल्याला कसें दृष्टीस पडलें ? ( स्वगत ) रसरशीत खदिरांगाराच्या शय्येवर लोळल्याप्रमाणें मला अनंत यातना होताहेत !

**दौलतराव**—इतक्यांत तिचा बाप तेथें येतो आहे अशी तिच्या त्या दासीनें तिला वर्दी दिली, त्याबरोबर घाबरून तिनें आपल्या शयन-मंदिरांत मला झटकन् लपविलें !

**झुंजारराव**—काय ह्मणतां ? तिचा बाप येत होता ?

**दौलतराव**—असें ती ह्मणाली. परंतु पुढें मला त्यांच्या भाषणावरून कळून आलें कीं, तोहि तिचा एक प्रियकर होता !

**झुंजारराव**—(स्वगत) आतां आणखी काय राहिलें ऐकायचें ? निःसंशय तीच ती जखीण !

**दौलतराव**—त्या आपुकमापुकांत कसला तरी कलह चालला होता, असें मला आढळून आलें. पुढें त्यांचा समेट झाला कीं काय तें मला माहीत नाहीं; कारण, तितक्यांत तिचा बाप खरेंच आला. त्यावेळीं त्या गृहस्थाचीं शंभर वर्षें भरलींच होतीं; परंतु एका युक्तीनें तिनें त्याला तेथून बाहेर काढून लावला.

**झुंजारराव**—( स्वगत ) ती चांडाळीण जन्मतांच कां मेली नाहीं ? अथवा एखादा भयंकर रोग होऊन तिच्या अंतरात्म्याप्रमाणें, तिचें तें मोहक बाह्य सौंदर्य घाणेरडें कां होत नाहीं ? आतां संशयाला कांहीं थारा राहिला नाहीं ! खरोखर, हा मला ओळखतो आणि मला चिडविण्याकरितां मुद्दाम असें बोलतो आहे ! नाहीं—नाहीं आतां मला हें सहन होत !

**रंभाजीराव**—तो तिचा प्रियकर जातांच तुझी तिची पुनः गांठ पडली, हेंच ना पुढें दौलतराव ?

**दौलतराव**—नाहीं रे ! त्या गध्यानें मध्येंच येऊन घात केला ना ? ह्मणून तर सारें फसलें. नंतर पुनः ती माझ्या दृष्टीसच पडली नाहीं !

**झुंजारराव**—(स्वगत) ठीक ! उत्तम. देवा! ह्या प्रसंगीं मला शांति दे, नाहीं तर क्रोधानें माझें हृदय खास फुटेल !

**रंभाजीराव**—अरेरे ! फार वाईट झालें.

**दौलतराव**—ज्या मदनदूतीनें मला त्या महालांत आणलें, तिनेंच मला नंतर बाहेर आणलें. मी बागेच्या ज्या दरवाज्यानें आंत आलों तो दरवाजा त्या सुंदरीच्या बापानें बंद करून टाकला होता; त्यामुळें मला बागेच्या उंच भिंतीवर चढून रस्त्यांत उडी टाकावी लागली. थोडक्यांत चुकलें, नाहीं तर जन्माचा लंगडा व्हायची पाळी होती !

**झुंजारराव**—( स्वगत ) असें काय ? याची माझी चुकामुक पडली ती अशी वाटतें ?–मरो ती शिंची गुलाब ! ( उघड ) आज सकाळींच जी स्त्री तुह्माला वसंतबागेंत भेटली, तीच का ही ?

**दौलतराव**—तें कांहीं सांगतां येत नाहीं. ती स्त्री कोण हें जाणायची माझीहि इच्छा होती; ह्मणून माझ्या नोकराला तिच्यावर ती घरीं जाईपर्यंत नीट नजर ठेवण्यास सांगितलें होतें. पण आयत्या वेळेस तो गाढवाचा लेक आपला खुशाल घोरत पडला; पण त्याला त्याबद्दल मुष्टिमोदकांचें चांगलें भोजन घालून पुनः तिच्या शोधासाठीं पाठविलें. पण तो महा कुचर ! अझून कांहीं मला भेटला नाहीं.

**रंभाजीराव**—पण हा पहा तोच आला !

[ पिन्या येतो. ]

**दौलतराव**—पिन्या, गाढवा, अझूनपर्यंत तूं होतास तरी कुठें ?

**पिन्या**—वाजी वा ! ह्यो अडीच घंटे मीच आपनाम्नी सोधतों हाय धनीसाब; पन कुठबी आपला पत्ताच लागना ! आपुन सांगितलेलं काम कस चोख बजावलं हाय सरकार !

**दौलतराव**—काय ? काढलास का तूं तिचा पत्ता ?

**पिऱ्या**—व्हय जी! ह्यो पट्ट्या काय काडल्याबगर ऱ्हानार व्हय? त्या आवाचें नांव ताराबाई आन् तिच्या बाच नांव ह्मन संभाजीराव शिरक. माझ्यासंग याल सरकार तर त्या आवाचं घर बिनचूक दावून देईन बगा.

**झुंजारराव**—( स्वगत ) अरेरे! अंगाची कशी आग झाली आहे. अरे मांगा!

**दौलतराव**—( स्वगत ) काय? ताराबाई? माझी प्रिया ज्या घरीं आहे त्या घरच्या धनिणीचें हें नांव. पण छे! ही ती नव्हे. ही कुणी निराळी दिसते.

**रंभाजीराव**—ताराबाई! अगदीं खोटें. तूं याच्यावर बिलकुल विश्वास ठेवूं नको दौलतराव!

**पिऱ्या**—ह्ये खोट ठरलं तर ही माझी जिभलीच उतरूनशान् देईन मी!

**झुंजारराव**—गाढवा! तूं अगदीं खोटें बोलतो आहेस! भलत्याच स्त्रीची अब्रू खराब केल्याबद्दल कुत्र्या! हें असें प्रायश्चित्त मिळतें. ( लाथा मारतो. ) आणि तुझा धनीहि जर तुला खरा ह्मणत असेल—

**दौलतराव**—नाहीं महाराज! माझ्याशिवाय मी कुणाची खात्री धायचा नाहीं. पाहिजे तर तुह्मी त्या गध्याला दोन लाथा जास्त चढवा; माझ्याकडून हरकत नाहीं.

**पिऱ्या**—येऊं द्या तर खरा आतां त्याला ह्योर, मंग दावतो त्याला या पिऱ्याचा हिसका!

**दौलतराव**—नाहीं तरी मी तुला खरपूस मार देणारच होतों; माझे श्रम यांनीं वांचविले, हे माझ्यावर यांचे उपकार आहेत. तुला एक शब्दहि बोलायचें कारण नाहीं. समजलेत का गद्धोजीराव!

**रंभाजीराव**—दौलतराव! यांत कांहीं तरी चुकी झाली असली पाहिजे. तारेला मी पूर्णपणें ओळखतों. वसंतबागेंत सकाळीं ती तुला भेटणें शक्यच नाहीं!

**दौलतराव**—अशी फाजील खात्री बाळगूं नकोस रंभाजीराव! हीच स्त्री मला सकाळीं भेटली, असें अनुमान काढायला मला कांहीं कारणें आहेत.

**झुंजारराव**—तुमचीं कारणें मला सांगा पाहूं काय तीं?

**दौलतराव**—कां बरें? एवढे अगदीं जोरानेंसे विचारतां आहां!

**झुंजारराव**—तुमचीं हीं कारणें अन् पुरावे यांचा जाब मागायचा मला पूर्णपणें हक आहे. समजलांत?

**दौलतराव**—वहावा! तुह्माला किंवा दुसऱ्या कुणाला माझ्या विचारांची चौकशी करण्याला कसा अधिकार पोंचतो, हें मला समजत नाहीं!

**झुंजारराव**—तारेसंबंधीं प्रत्येक बाबतींत मला पूर्ण अधिकार आहे. तिच्या नांवाला काळिमा लागण्यासारखें बोलून, त्याचीं कारणें सांगत नाहीं तो मनुष्य अगदीं नीच असला पाहिजे! (तरवार उपसतो.)

**दौलतराव**—(स्वगत) अरे अरे अरे! काय मीं केलें हें? आतां अगदीं तोंडाला कुलुप!

**रंभाजीराव**—झुंजारराव! असा एकदम हातघाईवर कां येतोस? सर्व गोष्टींचा शांतपणें विचार केला पाहिजे! याच्या मुळाशीं खास कांहीं तरी चुकी किंवा गैरसमज आहे.

**दौलतराव**—झुंजारराव! मीहि कांहीं हातांत बांगड्या भरल्या नाहींत. ही माझी तरवार म्यानाबाहेर यायला उत्सुक आहे. माझा धंदा कापाकापीचाच आहे; तरी तो मला मनापासून आवडत नाहीं. कापाकापीस प्रवृत्त होण्यापेक्षां होतां होईल तों निवृत्त होणें मला बरें वाटतें. रंभाजीराव ह्मणतो त्याप्रमाणें यांत कदाचित् चुकी असण्याचा संभव आहे. जर ती तारा तुमची असेल, तर तिच्याशीं मीं प्रत्यक्ष किंवा परोक्ष कसलाहि संबंध ठेवणार नाहीं, असें मी पाहिजे तर तुह्माला वचन देतों. पण मी ह्मणतों ही स्त्री तुमची तारा नसून दुसरी कुणी असली, तर जगांतल्या सर्व 'तारा' नांवाच्या स्त्रियांवर तुह्मी हक्क चालविणार नाहीं अशी मला आशा आहे!

**झुंजारराव**—तुमच्या कुर्रेबाज गर्विष्ठपणाच्या भाषणावरून तर मी मुळींच चुकलों नाहीं अशी माझी आतां पक्की खात्री झाली! मजजवळ तुमची ही लुच्चेगिरी चालायची नाहीं.

**दौलतराव**—अन् माझ्याजवळहि तुमची ही टोलेबाजी चालायची नाहीं!

**झुंजारराव**—काय टोलेबाजी? पुनः तोंडांतून असला शब्द तर काढ खरा ह्मणजे, उभा चिरून टाकतों!

**दौलतराव**—(तरवार उसपून) चल ये छाती असली तर!

**पिऱ्या**—एक शबुद बी बोलू नको झोर! आमी दोग हाओं तुमी बी दोगजण हां, होउद्यात कीं दोन हात! पघूकी तुमचा पराकरम! धनीसाब! हुकूम मातुर द्या या पठ्याला, की याला इथल्या इथ गाडुन टाकतों!

**रंभाजीराव**—अरे हो, अरे हो! थांबा-तुह्मा दोघांनां शपथ आहे! नुसत्या संशयावर असे पिसे होऊन तरवारींनीं लढूं नका. अगोदर कुणाकडून काय अपराध घडला याविषयीं शांतपणें विचार करा अन् मग—

**झुंजारराव**—ठीक आहे! आतां त्या कुलटेकडे जाऊन काय तो नीट तपास लावतों अन् मग-भेटालच पुनः तुह्मी—

**दौलतराव**—हो हो! अगदीं पाहिजे तेव्हां.

[ झुंजारराव जातो.

**पिऱ्या**—कां? कसा है या मर्दाचा हिसका? इचिभन नुस्त्या धमकावणीनंच गेला की पळून!

**रंभाजीराव**—काय तरी चमत्कार! एका क्षणांत तुमच्यामध्यें भांडण उत्पन्न होऊन तरवारी उपसण्यापर्यंत पाळी आली. तारेचा अन् याचा नुकताच कुठें समेट झाला होता; इतक्यांत त्यांच्यांत पुनः जंगी भांडण होण्याजोगी तूं आग लावून दिलीस. दौलतराव! मला तर अगदीं खात्रीपूर्वक वाटतें आहे कीं, पिऱ्याची माहिती चुकीची आहे!

**पिऱ्या**—बिलकूल न्हाई सरकार! पक्की चौकशी केल्याबिगर ही गोस्ट आपनाह्मी नाहीं मीं सांगितली धनीसाब!

**दौलतराव**—माझ्या बोलण्यानें त्या बिचाऱ्या तारेला मात्र त्रास होणार याबद्दल मला फार वाईट वाटतें. पण तीच या गृहस्थाची भावी पत्नी असेल असें मला काय स्वप्न पडलें होतें? पण रंभाजीराव! हे अतत्याई गृहस्थ कोण?

**रंभाजीराव**—हैबतराव मोरे ह्मणून इथें एक सरदार आहेत, त्यांचे हे चिरंजीव! गृहस्थ एरवीं फारच उत्तम, जिवाला जीव देणारा आहे; परंतु प्रेमसंबंधांत त्यारी फार संशयी अन् तिखट आहे! त्याच्या बापाचा तो एकटाच मुलगा आहे. त्याच्या तापटपणाचें हेंहि एक कारण आहे ह्मणेनास!

**दौलतराव**—ज्या आईबापांनां एकच मूल असतें, ते बहुधा त्याला एककल्ली किंवा मूर्ख करून ठेवतात!

**रंभाजीराव**—तसा तो एकुलता एक नाहीं आहे. त्याला एक बहीण आहे. बापाच्या मूर्खपणामुळें तिच्यावरहि वाईट प्रसंग आला आहे. तिच्या इच्छेविरुद्ध तो एका थेरड्याशीं तिचें लग्न लावणार होता. तें चुकविण्यांकरतां तिनें जीव दिला कीं कुठें परागंदा झाली कांहीं कळत नाहीं. पुष्कळ शोध करूनहि अद्याप तिचा शोध लागला नाहीं.

**दौलतराव**—ती नाहींशी होऊन किती दिवस झाले ?

**रंभाजीराव**—किती दिवस कसचे ? काल संध्याकाळींच ती नाहींशी झाली.

**दौलतराव**—( स्वगत ) काय ? काल संध्याकाळीं ! वेळ तर जमते ! ( उघड ) ती कशी नाहींशी झाली ?

**रंभाजीराव**—कुणालाच ठाऊक नाहीं ! खिडकींतून उडी टाकून पळून गेली असावी, असा लोकांचा तर्क आहे.

**दौलतराव**—( स्वगत ) अगदीं संशय नको ! मीं झेलून वांचविली तीच ही ! ( उघड ) ती रूपानें, बांध्यानें वगैरे कशी आहे ?

**रंभाजीराव**—फारच सुरेख ! मध्यम बांध्याची, पिवळट गोरी, पोंवळ्या-प्रमाणें लाल ओंठाची आणि भ्रमराप्रमाणें काळ्या केंसांची–

**दौलतराव**—( स्वगत ) याच्या या वर्णनें माझ्या आनंदाला सीमा नाहींशी झाली आहे–तीच ती ! ( उघड ) तिचें नांव काय ?

**रंभाजीराव**—चंपा; पण दौलतराव ! तुला तर फारच आनंद झाल्या-सारखा दिसतो !

**दौलतराव**—माझा स्वभाव मुळापासूनच फार रंगेल आहे, हें तुला माहीत आहेच. अशा सुंदर स्त्रीचें मार्मिक वर्णन ऐकून कुणालाहि आनंद होईल–मग मला तर फारच होणार ! ( स्वगत ) नेमलेल्या वेळासाठीं मी आतां किती उत्कंठित झालों आहें हा ! मी आतां वसंतबागेंत जाऊन त्या रुमालवाल्या स्त्रीची वाट पहात बसतों. ती जर ठरल्यावेळीं मला तेथें भेटली नाहीं, तर माझ्या प्रियेचा शोध करायला तारेच्या घरीं पुनः जाईन. तिच्या भावाच्या तापट संशयी स्वभावाला आतां नाहीं मी भीक घालणार !—बरें रंभाजीराव ! मला आतां एका गृहस्थाला भेटायला जायचें आहे, जातों मी आतां.

**रंभाजीराव**—ठीक आहे. पण होईल तितकें लवकर ये.

[ जातो.

**दौलतराव**—पिऱ्या ! तुला आतां कांहीं काम नाहीं. जा लेका, तुला सुटी आतां !

[ जातो.

**पिऱ्या**—काय इचित्र न्याव पघा! समद्यांनीं या पिऱ्याल्लीच खोटा ठरविला अं! ह्यो असाच निघालों त्येचा सोध करायला! त्या लेकानंच माल्ली तसं सांगितलं न्हे का? या पिऱ्याल्ली खोटपनाची अक्शी लई चीड हाय!

[ जातो.

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थल**—तारेचा महाल. तारा आणि चंपा बोलत बसल्या आहेत, असा प्रवेश. ]

**चंपा**—वहिनी! ती वेळ जसजशी जवळ जवळ येत चालली आहे, तसतसा माझा धीरहि गळत चालला आहे. माझ्या या कृत्याबद्दल बाबा, दादा, तसंच सारं जग काय ह्मणेल याची कल्पना मनांत येऊन भीतीनं हृदय कसं धडधडत आहे! अजून माघार घ्यायला वेळ आहे असं वाटून—

**तारा**—काय ह्मणतां चंपाताई? दुसरे कांहीं ह्मणतील ह्मणून तुह्मी आपल्या जन्माची माती करून घ्यायला तयार आहां काय?

**चंपा**—अगबाई! त्या थेरड्या आनंदरावाची गोष्ट मनांत आली ह्मणजे—नको! नको! त्याला चुकवायला मी काय वाटेल तें करीन! त्यांतून त्या मदन-मनोहर स्वरूपाच्या राजबिंड्याशीं माझी जन्माची गांठ पडणारना? दोन तोंडाच्या जगाची पर्वा करून अमृताचा डोह सोडून विषसमुद्राकडे कोण धाव घेईल!

[ गुलाब येते. ]

**गुलाब**—ताईसाहेब, ताईसाहेब! झुंजारराव येताहेत.

**चंपा**—अगबाई, दादा येतो आहे वाटतं! मला गेलंच पाहिजे तर इथून. वहिनी! दादाची रवानगी लवकर करा बरं का.

[ जाते.

[ झुंजारराव येतो. ]

**तारा**—इतक्या लवकर कशाला बरं आलां फिरून? आपणाला मीं उद्यां यायला सांगितलं होतं ना?

**झुंजारराव**—( स्वगत )संतापानें माझ्या तोंडून शब्दच निघत नाहींत! यानें माझें हृदय फुटणार खास! ( कोचावर अंग टाकतो. )

**तारा**—अगबाई! असं काय करायचं! प्रकृति तर नीट आहे ना?

**झुंजारराव**—होय-नाहीं-मला काय झालें आहे तें मलाच कळत नाहीं ! तारे ! तूं इतकी बेमान-

**तारा**—असं काय ह्मणायचं हें ? पुनः आली वाटतं संशयाची लहर ?

**झुंजारराव**—(स्वगत) पहा तर खरी कशी बोलते आहे ती ! किती गर्व ! किती बेपर्वाई ! ठीक आहे-

**तारा**—मी जर आपल्या जागीं असलें तर जेव्हां जेव्हां मला अशी संशयाची लहर आली असती तेव्हां तेव्हां मी घरींच बसून राहिल्यें असल्यें ! ज्यांनां ती लहर सहन होत नाहीं, त्यांच्याकडे जाऊन असा मीं त्यांनां त्रास दिला नसता !

**झुंजारराव**—होय, तूं ह्मणतेस तें सारें मला चांगलें समजतें ! तुला माझ्याकडून त्रास होतो, हेंहि खरें आहे. एकदा तूं मला स्पष्ट सांग, ह्मणजे मी तुला पुनः त्रास द्यायला येणार नाहीं. कांहीं तरी माझी समजूत करून मला अशी फसवतेस कां ?

**तारा**—आपणाला मी आतां स्पष्टच सांगल्यें ! योग्य तऱ्हेनं माझ्याशीं आपलं वर्तन असलं तर आपल्या संगतीसारखं प्रियकर अन् सुखकर असं मला जगांत कांहीं नाहीं. पण आपल्या लहरी, संशयी स्वभावाचं मला खेळणं समजून मला जर आपल्या ताटाखालचं मांजर करून ठेवायचं आपल्या मनांत असेल, तर साफ सांगल्यें, आपल्या इतर सद्गुणांची पर्वा न करतां आपणाशीं मला फटकून रहाणं भाग आहे ! आपल्या या संशयरूपी प्रखर कुऱ्हाडीच्या घावामुळं माझ्या हृदयांत दृढमूळ असलेला प्रेमतरु ढांसळूं पहातो आहे !

**झुंजारराव**—आणि तारे ! मीहि तुला आतां स्पष्ट सांगतों कीं, मी आजपर्यंत माझ्या प्राणांपलीकडे तुझ्यावर निष्कलंक प्रेम करित असूनहि जर तुला त्याची परवा नाहीं, तर अतःपर तूं कांहीं केलेंस तरी त्याचीहि पर्वा मी करणार नाहीं. माझ्या हृदयावरील तुझ्या प्रेमाचा ताबा झुगारून देणें मला फारसें कठीण नाहीं हें तुला उघड सांगतों ! मला तुझ्या प्रेमाची बिडी तोडणें तूं गर्वानें समजते आहेस इतकें कठीण नाहीं, असें मी साऱ्या जगाच्या निदर्शनास आणून देईन ! हा असा अरेरावीपणा, ही तुझी बेपर्वाई मला नाहीं सहन होणार !

**तारा**—बेमान! पुरुष तेवढे बेमान!! तुमचा अरेरावीपणा मी निमुटपणं सहन करित असतां मीच अखेरीस बेपर्वा अन् अरेरावी काय? तुह्मी माझं प्रेम झुगारून देणार? माझं पुनः दर्शन घेऊं नका ह्मणून किती वेळ निक्षून सांगितलं असतांहि पुनःपुनः आपल्या येण्यानं मला त्रास देणारे कोण? तुह्मीच ना? माझ्या पायांवर लोळण घेऊन क्षमेची याचना करणारे ते तुह्मीच ना? चोरून भेटी घेऊन, डोळ्यांत अश्रु आणून 'दया कर, आपल्या हृदयांत मला स्थान दे' अशा माझ्या विनवण्या करणारे ते तुह्मीच ना? कृतघ्न! शतकृतघ्न!! माझ्या प्रेमाची बिडी तोडणं जर कठीण नाहीं असं तुह्माला वाटतं आहे, तर ती अझूनपर्यंत तुह्मीं कां नाहीं तोडलीत? आजपर्यंत तर मग तुह्मीं ढोंगानं प्रेमाचं खोटंच अवडंबर माजविलंत! ज्याचं स्वतःचं मन शुद्ध नाहीं, त्याला दुसऱ्याच्या वर्तनाचा संशय यायचाच! कावीळ झालेल्या मनुष्याला सर्व जगच पिवळं दिसतं, त्याला साऱ्या जगानं काय करावं? प्रत्यक्ष जन्मदात्या बापाला फसविण्याचं पातक शिरावर घेऊन मीं आपणावर इतकं शुद्ध प्रेम ठेवलं असतांहि आपण जर त्याला अरेरावीपणा अन् बेपर्वाई समजतां, तर कांहींहि केलं तरी आपली खात्री होणं नाहीं, असंच मी समजलें!

**झुंजारराव**—माझ्या स्वभावांतील कमकुवतपणामुळें तुझी शक्ति प्रबल होते हें मला ठाऊक आहे! जसजशी तुझ्याकडे माझी ओढ जास्त तसतशी तुझी मजविषयींची बेपर्वाहि जास्त हें मला स्पष्टपणें दिसून येतें! मींच इतकें फाजील प्रेम तुला दाखविलें नसतें, तर तूं आपसूक नरम आली असतीस! पुनः आपणाला न भेटण्याबद्दल तूं मला बजावलें होतेंस खरें, पण त्या वेळेसहि तुझी पक्की खात्री होती कीं, कोडगेपणानें मी परत आल्याखेरीज रहाणार नाहीं! आणि मीहि खरोखर शुद्ध नंदीबैल! वेसण घातल्याप्रमाणें मी तुझ्याकडे आपोआप आलों! तुझ्या या मोहक सौंदर्यानें जणूं काय मी भारूनच गेलों होतों! तुझ्या या जादुगार डोळ्यांनीं मजवर वाजवीपेक्षां फाजील मोहनी घातली होती! माझ्या दर्जाच्या इतर सरदारांसारखा मजमध्यें करारीपणा नाहीं ह्मणूनच तुला माझ्या हृदयावर असें जुलमी साम्राज्य चालवितां आलें!

**तारा**—केवढा गर्व हा! तुमच्या ह्मणण्याप्रमाणंच कां होईना, मीं तुह्मांला जिंकलं खरं, परंतु ही जिंकलेली वस्तु मला विशेष महत्त्वाची वाटली असती

तर मीं तिजबद्दल जास्त आदर दाखविला असता. ज्या वस्तूचा त्याग करण्यास आमच्या मनाला विशेष दुःख होत नाहीं, तिला आह्मी तितकें महत्त्वहि देत नाहीं. होय, तुह्मी ह्मणतां तसंच ! मला आपली पर्वा नाहीं—झालं ? आपल्यापेक्षां शेंकडों पटीनं उच्च दर्जाच्या पुरुषांचं हृदय काबीज करण्याइतकं मजमधें सामर्थ्य असतांहि, नशीब माझं, कीं आपलंच हृदय काबीज करण्याची मला त्या वेळेस दुर्बुद्धि झाली—

**झुंजारराव**—दुसऱ्याचीं हृदयें काबीज करण्यांत तूं किती पटाईत आहेस याचा मला कालपासून चांगलाच अनुभव येतो आहे !

**तारा**—झालं आतां ? मग मला उगीच त्रास द्यायला आतां कशाला राहिलां आहां इथं ?

**झुंजारराव**—उगीच कशाला संतापते आहेस माझ्यावर ? माझा त्रास सहन करायचा आतांचा हा तुला शेवटचाच प्रसंग ! आतां पुनः त्रास द्यायला मी इथें कधींहि येणार नाहीं. अतःपर माझी मुळींच पर्वा किंवा भीति न बाळगतां आपल्या प्रियकर दोस्तांनां सकाळीं वसंतबागेंत खुशाल भेटत जा. मी कांहीं तुला आडकाठी करायला येत नाहीं. आज एकदा तुझा महाल सोडला, कीं, प्रत्यक्ष ब्रह्मदेव माझी विनवणी करायला आला, तरी पुनः ह्मणून मी इथें कधीं येणार नाहीं !

**तारा**—फार चांगलं ! आपल्या या निश्चयानं मला फार आनंद झाला आहे ! आतांचे आतां तुह्मी निघून जाल तरी एका शब्दानंहि मी आपणाला नको ह्मणणार नाहीं ! पण सकाळीं वसंतबागेंत कुणाला भेटत जा असं आपण कायसं ह्मटलंत, त्याचा अर्थ काय तो मात्र मला कांहीं समजत नाहीं.

**झुंजारराव**—छे छे छे ! तुला काय कल्पना तरी आहे ? अगदीं भोळी तूं ! तोंडांत बोट घातलें तरी चावायचें कांहीं तुला कळत नाहीं. हो आज सकाळींच तूं वसंतबागेंत कुणाला भेटायला गेली नव्हतीसच मुळीं !

**तारा**—नव्हत्येंच गेल्यें ! अन् गेल्यें असल्यें तरी वाटेल तेव्हां वाटेल तिथं जायला मला आपली परवानगी नको !

**झुंजारराव**—नकोच माझी परवानगी ! वसंतबागेंत दौलतरावांनां भेट, तेवढ्यानेंच तृप्त न होतां नंतर त्याला आपल्या महालांत आणायला गुलाबला पाठव, तुझा बाप मध्येंच तिथें आला असतां त्याला आपल्या निजायच्या खोलींत लपव—याला माझी नकोच परवानगी ! हलक्यासलक्या हुजऱ्यांनांहि

तूं भेटलीस आणि त्यांनीं तुझ्यावरून लावण्या करून जिकडे तिकडे तुझ्या नांवाचा डंका गाजविला तर माझें त्यांत काय गेलें ? यालाहि नकोच माझी परवानगी !

**तारा**—हां ! माझ्याबद्दल असं भलतंसलतं बोलून मला अधिक संताप आणूं नका ! ( जवळ जाऊन ) गडे ! आज माझी योग्यता इतकी हलकी झाली का, कीं वाटेल त्याच्याशीं माझे नांवाची सांगड घालून आपण मला नाहीं नाहीं त्या शब्दांनीं ताडण करावं ? ( रडूं लागते. ) आपण इतके पाषाणहृदयी आहां काय हो ? ( स्वगत ) चंपाताई ! तुझ्यामुळं मजवर काय काय प्रसंग येताहेत हे !

**झुंजारराव**—( स्वगत ) छे: ! नाहीं ! हिला रडतांना मला नाहीं पाहवत ! स्त्रियांच्या नेत्रांतले अश्रुबिंदु आमच्या तरवारीपेक्षांहि हृदयाला लवकर फोडून टाकतात ! खरोखर ही निष्कलंक असेल का ? हिच्या या निष्कपट मुखावरून ही शुद्ध असावी, असें खात्रीपूर्वक वाटतें. ( उघड ) तारे !–तारे !–आतां कसची ऐकते ही ! तारे ! मला एवढ्या एका प्रश्नाचें उत्तर दे. दौलतराव या नांवाचा इसम तुला खरोखरच का ठाऊक नाहीं ?. अशी रडूं नकोस तारे ! दौलतरावाला तूं सकाळींच वसंतबागेंत भेटली होतीस कीं नाहींस ?

**तारा**—माझ्या निष्कलंक चरित्राला व्यर्थ डाग लागण्यासारखा नसता तर तुमच्या या प्रश्नाला मीं उत्तरच दिलं नसतं ! पण माझ्या जें स्वप्नींहि नाहीं–मग ह्यातून घडणं तर राहोच—अशा कृत्याचा भयंकर आरोप मला मुकाट्यानं सहन करतां येत नाहीं. ईश्वराला स्मरून मी सांगतें कीं, आज साऱ्या दिवसांत मी वसंतबागेंत गेल्यें नाहीं.

**झुंजारराव**—वसंतबागेजवळच्या रस्त्यांत तुला एक हलकट हुजऱ्या भेटला कीं नाहीं ?

**तारा**—होय भेटला. पण तो दारु पिऊन झिंगला तरी होता, किंवा मला दुसरीच कुणी स्त्री समजत होता. मग यापैकीं काय असेल तें असो.

**झुंजारराव**—मग दौलतराव तुझ्या ओळखीचा आहे कीं नाहीं ?

**तारा**—मला आतां कांहीं विचारूं नका ! आज रात्रीं या सर्व घोटाळ्याचा उलगडा होऊन मजविषयीं आपणाला जो घाणेरडा संशय आला आहे, त्याचीहि निवृत्ति होईल. यापेक्षां अधिक आतां मी कांहीं सांगत नाहीं. माझं डोकं भणभणून गेलं आहे. कृपा करून मला इथं एकटी राहूं द्या.

**झुंजारराव**—पण मजवर तुझें प्रेम आहे का तारे ?

**तारा**—मी आतां कांहीं सांगत नाहीं ! आपण मघांशीं अगदीं जायला तयार झालां होतां ! मला आतां एकटी राहूं द्या ! ( त्याच्याकडे पाठ फिरवून बसते. )

**झुंजारराव**—बरें तारे, मी नाहीं आतां तुला त्रास देत ! (स्वगत) निर्दय ती शेवटपर्यंत निर्दय !

**तारा**—(स्वगत) माझ्यावर आलेल्या प्रसंगाप्रमाणं प्रसंग, मला वाटतं, कधीं कुणावर आला नसेल !

**झुंजारराव**—( स्वगत ) खास खास हिचें आचरण शुद्ध असलें पाहिजे, असें माझें मन मला साक्ष देतें. खरें म्हटलें, तर माझी तरी परवा हिनें कां करावी ? हिला पुनः सुप्रसन्न करून घेतलीच पाहिजे; नाहीं तर—कदाचित् संभाजीरावांचा बेत पार पडून माझा जन्माचा घात होईल. ( उघड ) तारे, मी निघालों बरें ! आतां एकदा शेवटचा प्रेमाचा शब्द तरी माझ्याशीं बोल ग ! ( तिच्या खांद्यावर हात ठेवतो, ती दोनतीनदा झिडकारते. ) नाहीं बोलत ?—नाहीं बोलत ?—नाहीं बोलत ?

**तारा**—(हंसून) काय तरी बाई ! आपल्यासारख्या संशयखोर माणसाजवळ बोलायचं ?

**झुंजारराव**—हंसलीरे हंसली अखेरीस ! तुला आहे ठाऊक काय तें माझ्या कलिजा !

**तारा**—( हंसून ) मला वाटलं होतं कीं, माझ्या प्रेमाची बिडी अगदीं सहज तुटण्यासारखी आहे !

**झुंजारराव**—( तारेचा हात आपल्या हातांत घेऊन) माझ्या स्वर्गीय देवते ! माझ्या प्राणा ! तुझी अद्भुत शक्ति तुला चांगली ठाऊक आहे ! माझें हें निष्कलंक, प्रेमानें तुडुंब भरलेलें हृदय आजपासून तुला अर्पण केलें आहे ! माझ्या संशयी उतावळ्या स्वभावाची मला फार लाज वाटते ! पण खरें म्हटलें तर असा हा स्वभाव अगदीं खऱ्या प्रेमाचा द्योतकच आहे ! अहाहा तारे !—

[ आंतून 'तुळाजी ! गाडीला नवें चाक घालून गाडी ताबडतोब दुरुस्त करीव, समजलास ?' असा शब्द होतो. ]

**तारा**—अगबाई ! हें काय नवीनच संकट ! बाबा परत आले वाटतं ?

आतां कसं करायचं ? आपण एके ठिकाणीं बाबांच्या दृष्टीस पडलों ह्मणजे झालाच घात ! अगबाई—

**झुंजारराव**—अशी घाबरूं नकोस तारे ! या खोलींत मी लपतों ! (चंपा असलेल्या खोलीशीं जातो, तों ती आंतून कडी घालते.) काय घोटाळा हा ! तारे ! तुझ्या खरेपणाचा इथल्या इथें मला चांगलाच प्रत्यय आणून दिलास ह्मणायचा ! पण आतां माझ्या प्रतिस्पर्ध्याला मी जीवंत नाहीं ठेवित— (तरवार उपसतो.)

**तारा**—भलत्याच वेळीं असा त्रागा करूं नका ! ईश्वराशपथ माझ्या हृदयांत आपणाला कुणी प्रतिस्पर्धी नाहीं ! बाबा आलेच ! त्यांच्या तुह्मी दृष्टीस पडणार कीं काय ? घात घात—

**झुंजारराव**—आंत कोण आहे, त्याला दार उघडायला सांग ह्मणजे मी या खोलींत लपेन. नाहीं तर हा असा इथ्थें उभा रहाणार ! काय होईल तें होऊं दे !

**तारा**—आपण सांगतां तें नाकबूल केल्यानं आपली व माझी कायमची ताटातूट होईल हें मला स्पष्ट दिसतं आहे, तरी तें मला पत्करलं; पण या खोलींत आपणाला मी जाऊं देणार नाहीं. तुमचं मजवर प्रेम आहे कीं नाहीं, याबद्दल मी सांगलें हें मान्य करून माझी खात्री करून द्या !

**झुंजारराव**—तो प्रश्न सध्याचा नाहीं आहे ! पुढें काय परिणाम होईल तो भोगण्यास मी तयार आहें—पण या खोलींत कोण आहे तें मी समजून घेणार ! बस ! तूं कांहीं केलेंस तरी मी आंत जाणार—मी खोलींत जाणार ! जाणार ! मी दार फोडून जाईन !

**तारा**—मी नाहीं जाऊं देणार ! नाहीं जायचं !

**झुंजारराव**—मी जाणार—जाणार !

[ संभाजीराव येतो. ]

**संभाजीराव**—अरे हें काय ? काय चाललें आहे हें इथें ? मी जाणार आणि जायचें नाहीं—अन् मी जाणार ! तुह्मी कोण हो रावसाहेब ?

**झुंजारराव**—( स्वगत ) आतां काय बोलूं मी ?

**संभाजीराव**—कोण झुंजारराव ? तुमचें काय आहे हो काम माझ्या इथें महाराज ?

**तारा**—बाबा ! आलां तुह्मी ? देवच पावला ह्मणायचा ! खरोखर, बाबा आयत्या वेळेस धावून आले ही खास देवाचीच करणी ! बाबा—याच्या

पोषाखावरून हा कुणी थोर कुलांतला अन् सभ्य दिसतो; पण याची करणी तुह्मीं ऐकलीत कीं हा अगदीं दुष्ट दुर्जन आहे अशी तुमची खात्री होईल. यानं इथं येऊन असं कांहीं वर्तन केलं कीं, कितीहि वाईट चालीचा मनुष्य असता तरी त्याच्या हातून असं वर्तन होतं ना! तुह्मी अकल्पित रीतीनं येतां ना तर मोठा अनर्थ गुदरणार होता.

**झुंजारराव**—( स्वगत ) अरे, हिच्या मनांत आहे तरी काय ?

**तारा**—बाबा! तुह्मी इथून निघून गेल्यावर कांहीं केल्या मला चैन पडेना, ह्मणून मी इथं शिवलीलामृताची पोथी वाचित बसल्यें होत्यें; इतक्यांत कुणी दरवाजा जोरानं खडखडवला व कुणी स्त्री दीन स्वरानं ओरडत असल्याचा मला भास झाला, ह्मणून तशीच घाईनं धावत जाऊन मीं दरवाजा उघडला. त्या बरोबर एक बुरखा घेतलेली स्त्री एकदम आंत घुसली. तिनं घाबऱ्या घाबऱ्यानं मला हात जोडून विनंति केली कीं 'माझ्या मागनं एक दांडगा पुरुष माझा पाठलाग करित येतो आहे, त्याच्यापासून माझं रक्षण करा.' ती बिचारी सारखी रडत होती. त्यामुळं मला त्या बिचारीची दया आली. तिला या खोलींत घालून मी दरवाजा लावल्यें, इतक्यांत बाहेरचा दरवाजा उघडाच राहिला होता त्यांतून हा मुर्दाड मनुष्य हातांत नागवी तरवार घेऊन आंत आला आणि मला दरडावून ह्मणाला 'बऱ्या बोलानं ती स्त्री माझ्या हवालीं करा नाहीं तर जबरदस्तीनं दरवाजा फोडून मी तिला घेऊन जाणार!'

**झुंजारराव**—( स्वगत ) अरेच्या! हिचा विचार तरी काय आहे ? फौजदाराच्या स्वाधीन करविणार कीं काय ही मला ?

**तारा**—माझ्यांत दम होता तोंपर्यंत मीं याला थोपवून धरला. तुह्मी जर आयत्या वेळीं येतां ना, तर यानं खोलीचं दार फोडलंच असतं! पण मला वाटतं बाबा, हा इसम दारू पिऊन झिंगला असावा, नाहीं तर सभ्य दिसणारा हा इसम असं बेशरमपणाचं कृत्य करायला तयार होता ना! ( झुंजाररावाला डोळ्यानें खुणावते. )

**संभाजीराव**—मी तर आश्चर्यानें अगदीं थक्कच होऊन गेलों आहें!

**झुंजारराव**—( स्वगत ) काय आश्चर्य तरी! वहावा! स्त्रीचरित्र अगम्य ह्मणतात तें खोटें नाहीं! एका क्षणांत काय चमत्कारिक गोष्ट बनविली ही हिनें! मी दारू पिऊन झिंगलों अं? ही हिची मला सूचना दिसते. तर आतां झिंगल्याचीच बतावणी करून जाऊं या पार पडून!

**संभाजीराव**—झुंजारराव ! एका लचांडांतून तूं कुठें मोकळा होतो आहेस, तों हें कसलें दुसरें कुलंगडें उपस्थित केलेंस ? एका अबला स्त्रीवर तुटून पडणें हें तुझ्यासारख्या मोठ्या कुळांतल्या पुरुषास तर फारच लाजिरवाणें आहे !

**झुंजारराव**—( झिंगल्याप्रमाणें करून ) कोण मी तुटून पडलों ? मी नाहीं तुटून पडलों. तीच माझ्यावर तुटून पडली. भर हमरस्त्यावर माझा मुडदाच पाडणार होती ती !—तिला बाहेर येऊं द्या अन् सांगूं द्या हें खरें का खोटें तें ! तिला दार उघडून बाहेर तर यायला सांगा अन् तुमच्यासमक्षच मला ती खोटा ठरवूं दे, मग तर झालें !

**संभाजीराव**—तारे ! तिला दार उघडून बाहेर यायला सांग. तिला याच्यापासून तिळमात्र इजा व्हायची नाहीं अशी मी तुला हमी देतों.

**झुंजारराव**—छे छे ! माझ्याकडून तिला मुळींच इजा व्हायची नाहीं. ( स्वगत ) दम धर चांडाळणी ! तुझे दांत तुझ्याच घशांत घालतों. आतां पाहूं काय करतेस ती !

**तारा**—( खोलीच्या दारावर थापा मारून मोठ्यानें ) बाई ! तुम्ही खुशाल या बाहेर. तुमच्या केंसालाहि धक्का लागायचा नाहीं. तुम्हांला कुणाच्या दृष्टीस पडायचं नसलं तर बुरखा घेऊन या. मुळींच भिऊं नका. मी योग्य तजवीज करून सुखरूपपणं तुम्हांला पोंचती करीन. काळजी करूं नका. ( स्वगत ) माझ्या बोलण्याचा मतलब चंपाताईच्या ध्यानांत येवो, म्हणजे झालं !

[ चंपा बुरखा घेऊन येते. ]

**चंपा**—बाई, तुमचे मजवर फार उपकार झाले बरं !

[ जाते.

**झुंजारराव**—( स्वगत ) अरे बापरे ! हें काय लचांड ? ही खरीच स्त्री ! एकूण, माझा सारा भ्रमच कीं काय ?

**तारा**—( झुंजाररावाला एकीकडे ) बाबांपासून लवकर सुटका करून घ्या अन् वसंतबागेजवळ त्रिविक्रम दीक्षित म्हणजे तुमच्या मामांचे उपाध्ये-यांच्याकडे माझ्या मागोमाग या. तिथं या सर्व घोटाळ्याचा उलगडा होईल. तिथंच आपल्या विवाहाची सर्व जय्यत तयारी केलेली आहे. लवकर मात्र या !

[ जाते.

**संभाजीराव**—( तारेच्या मागोमाग झुंजारराव जाऊं लागतो त्यास अडवून ) हं हं! ती बाई पार जाईपर्यंत इथून एक तसूभरहि मी तुला हलूं देणार नाहीं! ( तरवार उपसून ) शरणागतांचें रक्षण करणें हें आमच्यासारख्यांचें आद्यकर्तव्य आहे; त्याच्या आड तुला कांहीं झालें तरी मी येऊं देणार नाहीं! तारे! जा तुह्मी. तिला सुखरूपपणें पोंचवून तूं परत येईपर्यंत मी झुंजाररावाला इथून हलूं देत नाहीं. झुंजारराव! तोंपर्यंत तूं अन् मी इथें बसून काय करणार? एकमेकांच्या तोंडाकडे टकमक पहात बसायचें हेंच कीं नाहीं? त्यापेक्षां सोवळेकऱ्याकडून फराळाचीं दोन ताटें इथें मागवतों; अन् आपण घेऊं मग त्यांचा समाचार!

**झुंजारराव**—जळो तो तुमचा फराळ! मला फराळाबिराळाची बिलकुल जरूर नाहीं.

**संभाजीराव**—तुला फराळबिराळ करायचा नसेल, तर नको बापडा करूं. तुझी मर्जी! पण इथून मात्र तुला हलतां कामा नये.

**झुंजारराव**—मला गेलेंच पाहिजे! तुमच्या ह्या सुरकुत्या पडलेल्या अन् पांढरे कल्लेवाल्या चेहऱ्याकडे पहात बसण्यापेक्षां मला एक आतां फारच निकडीचें काम आहे. त्यासाठीं मला आतांचे आतां इथून गेलेंच पाहिजे!

**संभाजीराव**—असें कोणतें निकडीचें काम आहे तें?

**झुंजारराव**—आज गोरज मुहूर्तावर माझें लग्न व्हायचें आहे. बरें तर रामराम! येतों ह्मटलें—

**संभाजीराव**—काय ह्मणतोस तुझें आज लग्न व्हायचें आहे? अझून धुंदी उतरली नाहीं वाटतें साफ?

**झुंजारराव**—नाहीं उतरली अझून! संभाजीराव! आमच्या गुरूनें लहानपणीं आह्माला असें पढविलें आहे कीं, आपापल्या लग्नाच्या वेळीं तुह्मी सपाटून दारू ढांसून या, ह्मणजे तुमची बायको काळी, वेडीविद्री असली तरी ती तुह्माला इंद्राची अप्सरा भासेल! मीं ढांसली असो कीं नसो, लग्नासाठीं मला आतां गेलेंच पाहिजे. तुमचा मजवर विश्वास बसत नसला तर तुह्माला याबद्दल मी प्रत्यक्ष पुरावा दाखवितों पाहिजे तर!

**संभाजीराव**—बरें, दाखव पाहूं तुझा तो पुरावा!

**झुंजारराव**—(एकदम उडी मारून संभाजीरावाजवळ जातो व तरवारीचें टोंक त्याच्या छातीशीं धरतो.) बोला संभाजीराव! पटला पुरावा? आतां जाऊं देतां कीं नाहीं मला? का खुपसूं?

**संभाजीराव**—( भयभीत होऊन ) पटला ! पूर्णपणें पटला बाबा, तुझा पुरावा! जा–लवकर जा !

**झुंजारराव**—बरें, येतों संभाजीराव, रामराम ! तरी पण तुह्मी मघांशीं ह्मणालांत त्याप्रमाणें फराळाचीं ताटें आणवित असाल तर पहा बुवा ! आपल्याकडून कांहीं आतां ना नाहीं !

**संभाजीराव**—नको–नको ! मुहूर्तबिहीर्त चुकेल अन् लग्न मोडल्याचें पाप माझ्या माथीं येऊन आदळेल ! जा बुवा तूं आतां, अन् घे आपलें लग्न झटकन् उरकून !

**झुंजारराव**—बरें संभाजीराव ! तुमच्याकडेच येईन मग ताटाला ह्मणजे झालें कीं नाहीं ?

[ जातो.

[ तुळाजी येतो. ]

**तुळाजी**—हैबतराव मोरे आपणाला भेटायला आले आहेत सरकार ! दिवाणखान्यांत बसले आहेत.

**संभाजीराव**—माझ्याशीं काय बरें काम त्यांचें ? त्यांचेंहि नाहींना लग्न व्हायचें ? जा त्यांनां इथेंच घेऊन ये. मला वाटतें, मुलाचा शोध करायला आले असतील ते इकडे.

[ तुळाजी जातो.

[ हैबतराव येतो. ]

**हैबतराव**—रामराम संभाजीराव ! तुह्मी घरींच भेटलां, हें ठीक झालें. आज दुपारीं तुह्मी कांचनपुरास जाणार होतां असें ऐकलें होतें मीं.

**संभाजीराव**—होय, त्याप्रमाणें मी निघूनहि गेलों होतों; परंतु इथून थोड्या अंतरावर जातों न जातों तों माझ्या गाडीचें चाकच मोडलें. तेव्हां परत फिरणें भाग पडलें. बरें, तुह्मी कां आलां होतां माझ्याकडे ?

**हैबतराव**—माझी मुलगी चंपा ही तुमच्या घरीं आहे, अशी मला बातमी लागल्यावरून तिच्या शोधासाठीं मी इथें आलों आहें.

**संभाजीराव**—तुमच्या मुलीबद्दल कांहीं मला माहिती नाहीं; परंतु तुमचा मुलगा मात्र नुक्ताच इथें आला होता. अशी दारू पिऊन तुंद झाली होती स्वारी, कीं बोलून सोय नाहीं !

**हैबतराव**—काय माझा झुंजार दारू पिऊन तुंद झाला होता ? अगदीं खोटी गोष्ट ! त्याला साऱ्या जन्मांत दारूच्या थेंबालाहि शिवतांना मीं कधी पाहिलें नाहीं. पण आहे कुठें तो आतां ?

**संभाजीराव**—तो आपल्या लग्नासाठीं म्हणून आतांच इथून गेला बुवा !

**हैबतराव**—त्याचें लग्न ! अन् कुणाशीं ?

**संभाजीराव**—तें नाहीं मला ठाऊक ! परंतु आपल्या लग्नाच्या पुराव्याचें पक्कें माप मात्र त्यानें माझ्या चांगलेंच पदरांत घातलें ! हैबतराव ! तुमच्या झुंजाररावाबद्दल आमची तारा कांहीं निराळीच हकीगत सांगेल. कोण आहे रे तिकडे ?

[ तुळाजी येतो. ]

**संभाजीराव**—अरे, तारेला इंकडे जरा बोलावून आण पाहूं.

**तुळाजी**—त्या मेण्यांतून मघांशींच बाहेर गेल्या.

**संभाजीराव**—मेण्यांतून बाहेर गेली ? म्हणजे ? बघ कुठें तरी वाड्यांतच असेल.

**तुळाजी**—नाहीं सरकार ! मीं प्रत्यक्ष त्यांनां जातांना पाहिलें. (हैबतरावास) आणि आपल्या चंपाताईहि ताईसाहेबांबरोबर मेण्यांतूनच गेल्या.

**हैबतराव**—कोण ! माझी चंपा ?

**तुळाजी**—होय. त्यांनीं आपले मेणे बसंतबागेकडे न्यायला सांगितलें, तेंहि मीं ऐकलें सरकार ! झुंजाररावहि तिकडेच गेले असावेत. त्याच बाजूली त्यांनां जातांना मीं पाहिलें.

[ जातो.

**संभाजीराव**—अरे ! या वेळेला वसंतबागेंत जायचें तारेल्या कारण काय ? माझें मन अगदीं गोंधळून गेलें आहे बुवा ! चला, तिकडेच जाऊं, म्हणजे समजेल सगळें. बरें रामराम हैबतराव !

[ जातो.

**हैबतराव**—यांत खास कांहीं तरी कारस्थान असलें पाहिजे ! हें कांहीं बऱ्याचें चिन्ह नाहीं. मलाहि तिकडेच गेलें पाहिजे.

[ जातो.

---

## प्रवेश ३ रा.

[ स्थल—संभाजीरावाच्या वाड्यासमोरचा रस्ता.
हिरोजी प्रवेश करतो. ]

**हिरोजी**—आपल्याला त्या गुलाबशीं पुनः संधान बांधलें पाहिजे. तिचें माझें बिनसलें हें कांहीं चांगलें नाहीं झालें. कांहीं तरी युक्ति करून तिचा अन् माझा समेट करून घेतलाच पाहिजे. त्या सटवीनें खास खास माझ्यावर कांहीं तरी जादू केली आहे. तिच्याकडे माझें मन सारखें धाव घेतें आहे !

[ पिऱ्या येतो. ]

**पिऱ्या**—राव ! तुमी हृत आतां भेटला ह्ये लईच ब्येस झालं पघा !

**हिरोजी**—कसें काय राव ! ठीक आहेना तब्येत ?

**पिऱ्या**—ही सलगी आन् मानपान न्हांउद्यात आतां दडुनशान येका कोपऱ्यांमंदी ! आतां राव ! या पिऱ्यासंग परसंग हाय ह्ये ध्यानामंदी ठेवा ! माझी खोड्या मनुक्षाची अक्षी लई चीड हाय ! त्यो आन् घरफोडी करनारा आन् सतरा बखत तुरंगामंदीं जाऊनशान् आलेला चोर योकूच ! अक्षी योकूच आन् काय ! ह्ये मी तुमाली बोलतुया राव तुमाली ! समजलं का? न्हाईतर मजसंग चला या वाड्यांत आन् ताराबाईच्या समूर माझी खात्री करूनशान् द्या, कीं, आज सकाळीं जी आवा तुमी माली दावलीत ती ताराबाई म्हणून ! न्हाई तर खूब समजूनशान् न्हा राव ! ह्यो पिऱ्या खोटं सांगन्याबद्दल तुमाली आतां नामी बक्षीस दिल्याबगर कंदीबी न्हानार न्हाई !

**हिरोजी**—ताराबाईच्या समोर खात्री करून द्यायची ? म्हणजे ! कसली खात्री ? तूं काय म्हणतोस तें मला कळत नाहीं.

**पिऱ्या**—त्ये कायबी मला ठाव न्हाई ! माझ्यासंग वाड्यामंदी येऊनशान् माझी खातरी करून दिल्यावगर आतां न्हाई राव तुमची सुटका ! न्हाई तर देतों आतां चापटपोळ्यांची मेजवानी तुमाली !

**हिरोजी**—अरे, तूं म्हणतोस तरी काय? तूं मारामारी करणारा रस्त्यांतला गुंडबिंड आहेस वाटतें ? या कुंजपुरांत असली धिंगामस्ती चालायची नाहीं, समजलास ? तूं वेडाबिडा तर नाहींस ?

**पिऱ्या**—कुनाला दम देतोसरे ? तुझ्या दमाला ह्यो मर्द भीक घालतो व्हय ? तुलाबी भीत न्है आन् तुझ्या बालाबी भीत न्है ! खऱ्याला कुट मरन न्है ! चल मुकाट्यानं वाड्यांत माझ्यासंग. ( हिरोजी जाऊं लागतो. )

अंहं ! ये नाहीं कांहीं चालायचं राव ! ( हिरोजीला धरून गुद्दे चढवतो. )

**हिरोजी**—( स्वगत ) अरे अरे अरे ! अरे पण हो ! अरे हो—

[ संभाजीराव येतो. ]

**संभाजीराव**—अरे कोण हे ? मारामारी कसली चालविली आहे तुम्हीं ? अन् तूं याचा खून करतोस आहेस कीं काय ?

**पिऱ्या**—पन अदुगर ह्यें सांगा माम्ही–ह्यो संभाजीराव शिरक्यांचाच वाडा ना? त्येंची पोरगी ताराबाई म्हूनशान् हाय, तिची माम्ही भ्येट घ्यायची हाय.

**संभाजीराव**—कोणरे तूं ? माझ्या पोरीला भेटणारा तूं कोण ?

**पिऱ्या**—तुमीच संभाजीराव व्हय ? मंग लई ब्येस झाल पघा ! बाईच तुमी तिला भाइर बोलवा रावसाब ! या लुच्च्या चोरानं माम्ही सकाळी सांगितलं हाय त्यें खरका खोटं तें तिच्याच तोंडावर आन् तुमच्याबी समूर तिला इचारतों.

**संभाजीराव**—काय सांगितलें यानें तुला सकाळीं ?

**पिऱ्या**—आपल्याला समदं खरं खरं सांगतों रावसाब ! ह्या पिऱ्याम्ही खोट्याची अक्षी लई चीड हाय पघा. आज लई सकाळीं, तुमी काय म्हंगता त्येला–इष्बिभन वसंतबाग का काय, थत माझ्या धनीसाबाम्ही येक तरनीजान फटाकडी आवा भ्येटली. ती आपल्या घरीं जाईपावत तिच्यावर नजर ठेवायला धनीसाबांनीं माम्ही हुकूम केला व्हता. तिला म्यां याच वाड्यांत शिरतांना व्हेरलं. तितक्यामंदी ह्यो भामटा या हतच माम्ही भ्येटला. ती आवा कोन म्हून म्यां याम्ही इचारलं तवां यानं माम्ही सांगितलं रावसाब ! कीं त्या आवाच नांव म्हन ताराबाई आन् तिच्या बाच नांव संभाजीराव शिरक !

**संभाजीराव**—( स्वगत ) काय, माझी तारा अगदीं सकाळीं बाहेर पडून परक्या पुरुषास वसंतबागेसारख्या ठिकाणीं खुशाल भेटते ! काय ऐकतों मी हें ?

**पिऱ्या**—( स्वगत) ह्यो म्हातारा असा कां इवळतुया ?

**संभाजीराव**—( उघड ) हरामखोरा बेरडा ! कोणरे तुझा धनी ? कोण ?

**पिऱ्या**—हां तोंड संभाळूनशान् बोला म्हातारबुवा ! शियाबिया देऊं नका माम्ही. न्हाई तर मंग दावीन ह्या पिऱ्याचा हिसका ! म्हातारबुवा ! माझा धनीसाब तुम्हाला काय करायच हायती ? हिकमतीनं त्येंच नांव काढून घेतायाका माझ्या पास्नं ? पण ह्यो पिऱ्या तुमाम्ही अशी दाद देतुया व्हय बुढ्ढबुवा ?

**संभाजीराव**—अन् माझ्या पोरीची माहिती सांगणारा तूं कोणरे चोरा? ( काठी उगारतो. )

**हिरोजी**—( स्वगत ) या आडदांड स्वारीची यथास्थित कणीक तिंबेल असें कांहीं तरी यांनां सांगून दिलें पाहिजे! ( उघड ) मला अन् तुमच्या मुलीची माहिती? अगदीं बिलकुल नाहीं. मीं साऱ्या जन्मांत तुमच्या मुलीला काळी कीं गोरी कशी ती मुळींच पाहिली नाहीं!

**पिऱ्या**—( हिरोजीस टांग घालून खालीं पाडून त्याच्या उरावर बसतो. ) काय खोटेपना ह्यो? आतां मातर ऱ्हाई तुला ह्यो पिऱ्या सोडित! (गुद्दे मारतो.)

**संभाजीराव**—(स्वगत) मरोत हे शिंचे दोघेहि! वसंतबागेंत तारा कुठेंहि नाहीं. आतां तिचा शोध तरी कुठें करायचा? (उघड) कोण आहेरे वाड्यांत? चला या सारे. तारा असेल तिथून तिला हुडकून आणा माझ्या समोर.

[ झुंजारराव, तारा, दौलतराव, चंपा आणि गुलाब प्रवेश करतात. ]

**दौलतराव**—पिऱ्या! हरामखोरा! काय चालविली आहेस ही मस्ती?

**पिऱ्या**—धनीसाब! ह्योच त्यो थापाड्या भामटा! ताराबाई आन् संभाजीराव ह्यांची बातमी याच चोरानं माम्नी सांगितली, त्येच्याबद्दल ह्यें बक्षीस देतुया याला सरकार!

**दौलतराव**—चल सोड त्याला पिऱ्या! उठूं दे त्याला वर.

**झुंजारराव**—आज मोठा आनंदाचा दिवस आहे हिरोजी! आज तंटे बखेडे कांहीं न करतां खाऊनपिऊन तुह्मी चैन करा!

**हिरोजी**—जी हुकूम सरकार! हा शुद्ध दांडगेश्वर आहे! एकदम आपला हातघाईवर येतो!

[ हैबतराव येतो. ]

**हैबतराव**—चंपे! पोरी! अखेरीस सांपडलीस तूं मला! तोंडची वाफ घालविलीस त्याप्रमाणें मग जीवबीव नाहीं वाटतें दिलास?

**दौलतराव**—आपणाला ही सांपडली खरी; परंतु आतां ही आपली पूर्वीची चंपा राहिली नाहीं. हिचें लग्न झालें आहे!

**हैबतराव**—काय लग्न झालें? कधीं! कुणाबरोबर?

**दौलतराव**—या दौलतरावाबरोबर! ( पाय धरून ) मामासाहेब! मुहूर्ताच्या घाईमुळें आपली अनुमति आह्मांला घेतां आली नाहीं. आह्मी

उभयतां आपलीं फार अपराधी आहों. क्षमा करा. आपण आह्मांला क्षमा करायचीं नाहीं, तर करायची तरी कोणीं ?

**हैबतराव**—चंपे ! खरोखर यांच्याबरोबर तुझें लग्न झालें ?

**चंपा**—होय बाबा ! या अपराधाबद्दल आपण आह्मांला क्षमा करा.

**हैबतराव**—आणि तुह्मी कोण आहां ?

**दौलतराव**—मी रामनगरच्या सैन्यांत रिसाल्यावरचा मुख्य अधिकारी आहें. माझें नांव दौलतराव.

**हैबतराव**—पोरी ! फार चांगलें केलेंस ! आतां त्या आनंदरावांला मी तोंड तरी कसें दाखवूं ?

**संभाजीराव**—तुमच्या मुलीनें तुह्माला पुरें फसविलें खरें ! तारे ! तूं आपल्या मैत्रिणीच्या लग्नाला गेली होतीस ना ? तुला मीं किती शोधलें पण ! बरें, तुला नाहीं मी आतां त्यांबद्दल रागें भरत–तुझ्या मैत्रिणीचें लग्न झालें ह्मणून तूं वाईट वाटून घेऊं नकोस. चारआठ दिवसांच्या आंत तुझेंहि लग्न मी करून टाकतों.

**झुंजारराव**—आठ दिवस ह्मणजे फारच लांब ! शुभंच शीघ्रं ! पुढें काय होतें अन् काय नाहीं, ह्मणून आजच आह्मीं आपला विवाह यांच्याबरोबरच घाईनें उरकून घेतला !

**तारा**—होय बाबा ! क्षमा करा. माझ्या संबंधानं तुह्मीं जो विचार ठरविला होता, त्यानं तुह्माला पुढंमागं पश्चात्ताप झाल्याखेरीज राहिला नसता ! भलत्यासलत्या खुळ्या कल्पनेला बळी पडून आजोबांच्या सांगण्यावरून–तुमच्या स्वतःच्या मर्जीविरुद्धच असं मी ह्मणतें–आपल्या एकुलत्या एक मुलीच्या जन्माची धूळधाण करायचा जो विचार तुह्मीं मनांत आणला होतात, तो अमलांत येता तर जन्मभर आपणाला भयंकर पश्चात्तापाच्या इंगळ्या लागून राहिल्या असत्या ! तोंडी विनंतीपेक्षां प्रत्यक्ष कृतीनंच तुह्माला तुमची चुकी दाखवावी, असा विचार करून तुमची अनुमति न घेतां–परंतु आपल्या एकुलत्या एका मुलीच्या खऱ्या सुखाकडे पाहून तुह्मी क्षमा करालच असं खात्रीपूर्वक वाटल्यावरून, बाबा ! मीं हें धाडस केलं आहे ! ( पाय धरून ) क्षमा केली असं तुह्मीं ह्मटल्याखेरीज आतां मी तुमचे पाय सोडायंची नाहीं.

**रंभाजीराव**—( सद्गदित कंठानें ) उठ तारे ! उठ ! मीं तुला पूर्ण क्षमा केली आहे बरें. मोठ्या भयंकर प्रमादांतून तूं मला बांचविलेंस, याबद्दल मला आतां खरोखर आनंद होतो आहे. माझा तो खुळा विचार सोडून देण्याविषयीं तूं मला कितीहि तोंडानें सांगितलें असतेंस तर त्याचा परिणाम मजवर झाला असता कीं नाहीं, याची मला शंकाच वाटते. प्रत्यक्ष कृतीनें तूं माझी चूक मला दाखविलीस, याबद्दल लोकरीतिविरुद्ध मीच तुझे आभार मानतों. झुंजाररावासारखा रूपगुणसंपन्न नवरा ईश्वराच्या कृपेनें तुला मिळाला, याबद्दल मला अतिशय आनंद वाटतो आहे. झुंजारराव ! आजपर्यंत मी तुम्हाला एकवचनानें संबोधित होतों तो आतां सन्मानसूचक बहुवचनानें संबोधतों–तुमच्यासारखा गुणवान् पति माझ्या एकुलत्या एका मुलीला मिळाला, हे परमेश्वराचे मजवर फार उपकार आहेत. त्याच्याच कृपेनें तुम्हा उभयतांचा संसार सुखानें चालो, एवढीच माझी इच्छा आहे. सर्व मंडळीनें आतां माझ्याकडेच मेजवानीला यायचें. हैबतराव ! आपण आमचे आतां व्याही झालांत आणि सर्वांत आपणच वडील, तेव्हां या सर्व मंडळीला बरोबर घेऊन आपल्या पंक्तीचा आज आम्हांला लाभ दिला पाहिजे. बरें, तयारी करायला मी पुढें होतों.

[ जातो.

**हैबतराव**—तुम्हा सर्व तरुण मंडळीच्या आनंदीआनंदांत मी म्हातारा बुद्दक कशाला ?

[ जातो.

[ रंभाजीराव व मंजुळा येतात. ]

**झुंजारराव**—ये ये रंभाजीराव ! माझ्या या सौख्यानंदाचा वांटेकरी करायला मी तुला मुद्दाम बोलावणें धाडलें. हा सर्व आनंदाचा प्रकार तुला कळला असेलच !

**रंभाजीराव**—होय. तूं पाठविलेल्या मनुष्यानें मला सर्व हकीगत सांगितली. मोठ्या संकटांतून तुझी सुटका होऊन तुला या अमूल्य रत्नाचा लाभ झाला, याबद्दल मला अतिशय आनंद झाला आहे.

**दौलतराव**—पण रंभाजीराव ! इकडे थोडेंसें तरी लक्ष्य देशील कीं नाहीं ? तुझी ही वहिनी तुला बोलावते आहे.

**रंभाजीराव**—मित्रा ! अगदीं थोड्याच अवकाशांत कालची तुझी इच्छा पूर्ण झाली, याबद्दल मला फार आनंद वाटतो. आमच्या चंपाताईचा पति ह्मणून तुझी माझी मैत्री आतां दुप्पट झाली बरें का ? चंपाताई ! तुझी त्या भयंकर प्रसंगांतून मुक्तता होऊन दौलतरावासारखा गुणवान् पति तुला मिळाला याबद्दल खुद्द तुझ्याहूनहि मला अधिक आनंद होतो आहे. झुंजारराव ! तुझ्या सर्व कुशंका गेल्या ना आतां ?

**झुंजारराव**—अगदीं पूर्णपणें गेल्या ! खरोखर, माझ्या त्या वर्तनाबद्दल मला आतां फार लाज वाटते आहे. दौलतरावांची मीं अगोदरच क्षमा मागितली आहे. माझ्या प्रिय भगिनीबरोबर त्यांची संसारयात्रा पूर्ण सुखानें होवो, अशी माझी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे. विवाहसौख्य पूर्णपणें मिळविणें असल्यास, स्त्रीनें किंवा पुरुषानें आपला पति किंवा पत्नी पसंत केली पाहिजे— प्रेमाच्या राज्यांत प्रत्येक स्त्रीपुरुषाला पूर्णपणें मुभा असली पाहिजे, हें उत्तमोत्तम तत्त्व मला आतां स्वतःच्या अनुभवावरून उत्तम रीतीनें समजलें आहे !

**हिरोजी**—धनीसाहेबांनीं आतां सांगितल्या तत्त्वाप्रमाणें मी ही बायको पसंत करतों. (गुलाबचा हात हातांत धरून) गुलाब ! मला माझ्या त्या वर्तनाबद्दल क्षमा कर.

**गुलाब**—अगदीं मनापासून केली ! ताईसाहेब अन् झुंजारराव यांचं अनुकरण आपण करित आहों असं आजच झुंजारराव ह्मणाले होते. त्याप्रमाणं याहि बाबतींत आपणाला त्यांचंच अनुकरण करणं भाग आहे.

**पिऱ्या**—अरे काय ह्यो चमत्कार ! एका खिनांत हीं तीन जोडपीं जमलीं कीं ! ह्यो पिऱ्या मातुर अगदीं कोरा ऱ्हातो हाय ! नशीब त्याचं !

**झुंजारराव**—पिऱ्या ! असा खिन्न होऊं नकोस. मी काढतों तुझ्याकरतां बायको शोधून. (मंजुळेचा हात त्याच्या हातांत घालून) हं, ही घे तुला बायको !

**मंजुळा**—छोट्या धनीसाहेबांच्या इच्छेबाहेर मी तिळमात्र जायची नाहीं. जरी तुमची माझी फारशी ओळख नाहीं, तरी बाईसाहेबांची अन् माझी ताटातूट होऊं नये ह्मणून मी छोट्या धनीसाहेबांचं ह्मणणं मोठ्या आनंदानं कबूल करलें !

**पिऱ्या**—ह्रें मातर लईच नामी झालं ! वेताळाला ऱ्हाई बाइल आन् सटईला ऱ्हाई नवरा !

**झुंजारराव**—तारे ! किती भाग्याचा दिवस उगवला हा ! आजच्या प्रकारावरून सर्वांनीं चांगलाच बोध घेण्यासारखा आहे. मत्सर आणि संशय यांनां बलि पडून जे पुरुष स्त्रीजातीविषयीं हवीं तशीं भलतींच विधानें करतात त्यांच्या डोळ्यांत तारे ! तुझ्या निर्मल आणि उदात्त चरित्रानें झणझणीत अंजन पडेल, यांत संशय नाहीं ! आपल्या अप्रतिम सद्गुण–रूपाच्या उज्वल प्रकाशानें सर्व जगताला प्रकाशित करणारीं तुझ्यासारखीं कांतिमान् रत्नें ज्या स्त्रीज्ञातींत चमकत आहेत ती खरोखर धन्य धन्य होय !

[ शेवटचा पडदा पडतो. ]

